# नवभारत

वर्ष ८ वें ] जून १९५५ [ अंक ९ वा



— कविता, सार-संकलन —

वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# ' नवभारत ' निधि

## -- विनंति --

' नवभारत ' मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक ' नवभारता'च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधीस सर्वांनीं आपल्या शक्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु. देणगी देणारास ' नवभारत ' मासिक दहा वर्षें मिळत जाईल. या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ' नवभारत ' निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे मे १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| श्री. रामराव देशमुख ( अमरावती ) | १०० |
| श्री. गो. अ. रानडे, वकील ( इस्लामपूर ) | १०० |
| श्री. मुकणे ( दिल्ली ) | १०० |
| | ३०० |
| मागील महिनाअखेर जमा झालेली रकम | २०६७ |
| एकूण | २३६७ |

' नवभारत ' निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर (खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

' नवभारत ' निधि-समितीचें कार्यालय c/o ' नवभारत ' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या "खजिनदार, ' नवभारत ' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ " या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।५।१९५५
पुणें ४

**कृ. ना. फडके**
**मा. प. मंगुडकर** } कार्यवाह








सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें

अंक नववा

# नवभारत

जून

१९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. वेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

# 'नवभारत' मासिक, जून १९५५

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे– का. सं. ]

**प्रा. गंगाधर गाडगीळ** – मुंबई येथील ' सिडनहॅम कॉलेज ऑफ कॉमर्स'मध्यें प्राध्यापक. मराठींतील सुप्रसिद्ध लघुकथालेखक.

**श्री. प्रभाकर माचवे एम्. ए.** – ( दिल्ली ) ' साहित्य आकादेमी'चे एक कार्यकर्ते. हिंदी भारतीय भाषा व साहित्य यांचे व्यासंगी.

**श्री. तु. शं. कुलकर्णी** – हैदराबाद येथें मेडिकल डिपार्टमेंटमध्यें नौकरी. यांच्या कविता व लघुकथा मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत.

**श्री. भि. वि. मराठे** – मुंबई येथील मॅरिटाइम युनिअनचे कार्यकर्ते. विज्ञान आणि त्याचें तत्त्वज्ञान यांचे व्यासंगी.

**प्रा. रा. ना. जोशी** – सांगली येथील विलिंग्डन कॉलेजमध्यें पदार्थविज्ञानशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. प. वि. पटवर्धन एम्. ए. ( पुणें )** – अर्थशास्त्राचे व्यासंगी. ' ईस्ट इंडिआ कंपनी'च्या वेळच्या भारताच्या सामाजिक-आर्थिक परिस्थितीचा ' पीएच्. डी. ' करितां अभ्यास करीत आहेत.

**डॉ. मा. स. केळकर ( अकोला )** – निसर्गोपचारपद्धतीचे व्यासंगी तज्ज्ञ.

**श्री. शा. म. जोशी एम्. कॉम्.** – पुणें येथील 'दि साठे बिस्किट ॲन्ड चाकोलेट कंपनी'मध्यें अकाउंटंट.

**आरती प्रभु ( कुडाळ, जि. रत्नागिरी )** – यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत.

**सौ. सरिता पदकी एम्. ए.** – पुणें येथील ' डेक्कन कॉलेज ... ' संस्थेमध्यें शब्दकोशविभागांतील एक कार्यकर्त्या. यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत.

**श्री. जगन्नाथ टंकसाली** – मुधोळ येथील ' सरस्वतीमंदीर ' या राष्ट्रभाषाप्रचारसंस्थेचे संचालक.

**डॉ. ग. वा. तगारे एम्. ए. पीएच्. डी.** – कोल्हापूर येथील 'श्री. म. ता. टीचर्स ट्रेनिंग कॉलेज'मध्यें शिक्षणशास्त्राचे प्राध्यापक.



अनुक्रमणिका

प्रा. गंगाधर गाडगीळ

# रस आणि अनुभव

संस्कृत साहित्यांतील रससिद्धान्ताप्रमाणें साहित्य हें रसात्मक असतें, त्यांतून रसनिर्मिति होते, हीच भूमिका अनेक मराठी टीकाकारांनीं मान्य केलेली आहे. अलीकडे मात्र आम्ही कांहीं लेखक ' साहित्य म्हणजे अनुभवाची अभिव्यक्ति ' असें म्हणत असतों. ह्या दोन भूमिकांतील फरक दाखविणें हा ह्या लेखाचा हेतु आहे.

## रससिद्धान्ताचे विशेष

माझ्या विवेचनाच्या दृष्टीनें रससिद्धान्ताचे सहा महत्त्वाचे विशेष आहेत : (१) साहित्याचा मनावर होणारा संस्कार हा भावनात्मक असतो. (२) ह्या भावना निर्माण होत असतांना ज्या संवेदना होतात त्या साहित्याच्या संस्काराचा महत्त्वाचा अगर मध्यवर्ती भाग आहेत असें रससिद्धान्तांत मानलें जात नाहीं. ह्या संवेदना आनुषंगिक मानल्या गेल्या आहेत. अनुभाव व विभाव हे रसापासून अलग करण्यांत आले आहेत. त्यांना कांहींसें साधनांचें स्वरूप देण्यांत आलें आहे. (३) ह्याचाच एक परिपाक असा झाला आहे कीं ह्या संवेदनांना स्पर्श करण्याकरितां साहित्यिक जे विशिष्ट प्रकारचे भाषेचे प्रयोग करतो त्यांना अलंकार म्हणण्यांत आलें. हे अलंकार म्हणजे रसनिर्मितीचें व साहित्याच्या सजावटीचें साधन असें मानण्यांत आलें. (४) साहित्य ज्या भावना जागृत करतें त्या माणसाच्या मनांत असतातच. म्हणजे साहित्य कांहीं त्या भावनांची निर्मिति करीत नाहीं. साहित्याच्या द्वारें कसली तरी निर्मिति होते असें रससिद्धान्त म्हणत नाहीं किंवा रससिद्धान्ताच्या आधारानें तसें म्हणतांहि येणार नाहीं. (५) साहित्याच्या द्वारें निर्माण होणाऱ्या ह्या भावनांचें वर्गीकरण करणें हें रसचर्चेचें एक महत्त्वाचें अंग आहे. (६) साहित्याच्या द्वारें जागृत होणाऱ्या भावना ह्या रसपदवीला पोंहोचलेल्या असतात. व्यावहारिक जीवनांत होणारें दुःख ही नुसती भावना झाली. पण 'उत्तररामचरित ' वाचून झालेलें दुःख हें रसपदवीला पोंहोचलेलें असतें. तें आनंददायक असतें.

रससिद्धान्ताचे हे जे सहा विशेष सांगितले त्यांपैकीं प्रत्येक सदोष आहे असें आम्हां अनुभववाद्यांचें मत आहे.

## एकसंध अनुभवाचीं तीन अंगें

साहित्याचा मनावर होणारा संस्कार भावनात्मक असतो, असें म्हणण्यांत अव्याप्तीचा दोष पदरीं येतो. साहित्यांतून लेखकाचा अनुभव व्यक्त होत असतो व त्याच्या वाचनानें तो वाचकाला प्रतीत होतो. भावना हें ह्या अनुभवाचें एक अंग असतें. ह्या अनुभवाचे निरनिराळे भाग पाडतां येणार नाहींत. कारण तो एकसंध असतो. पण त्याचीं तीन अंगें असतात असें मात्र म्हणतां येईल. संवेदना, भावना व विचार हीं तीं तीन अंगें. रससिद्धान्ताचा दोष असा कीं ह्या तीन अंगांपैकीं दुसरें अंगच त्यांत ध्यानांत घेतलेलें आहे. शिवाय पहिलें अंग व दुसरें अंग ह्यांना अलग करण्यांत आलेलें आहे व संवेदना ह्या भावनानिर्मितीचें एक साधन असें मानण्यांत आलें आहे. पण संवेदना व त्यांपासून निर्माण झालेली भावना ह्या गोष्टी अशा अलग करतां येणार नाहींत. संवेदना नुसत्या भावना निर्माण करीत नाहींत, तर त्या त्यांना विशिष्ट असें स्वरूप देतात. तीं एकाच गोष्टीचीं दोन अंगें आहेत. त्याचप्रमाणें भावना व विचार ह्यांचीहि फारकत करतां येणार नाहीं. मनांत भावना स्फुरणें व विचार येणें ह्या गोष्टी एकदम होत असतात. एकाच अनुभवाचीं तीं दोन अंगें असतात. अर्थात् येथें मी विचार हा शब्द एका विशिष्ट अर्थानें वापरला आहे. हा विचार आणि शास्त्रीय विचार ह्यांत गल्लत करतां कामा नये. ह्या दोन प्रकारच्या विचारांतील भेदाचें पूर्ण विवरण करायचें तर एक स्वतंत्र लेखच लिहावा लागेल. पण तो भेद ह्या विवेचनापुरता दोन उदाहरणें घेऊन स्पष्ट करतां येईल.

'Life is a tale told by an idiot ... signifying nothing '

' Socrates is a man '

ह्या दोन्हीं वाक्यांत विचार आहे. पैकीं पहिल्या वाक्यांतील विचार हा दुसऱ्या वाक्यांतील विचाराहून नुसता निराळ्या प्रकारें व्यक्त झालेला नाहीं तर तो








निराळ्या प्रकारचाच विचार आहे. दुसऱ्या वाक्यांतील विचार हा शास्त्रीय विचार आहे. त्याच्याशीं आपल्याला कर्तव्य नाहीं. आपल्याला कर्तव्य आहे तें पहिल्या वाक्यांतून व्यक्त झालेल्या विचाराशीं. रसचर्चेत हा विचार लक्षांत घेतलेला नाहीं.

पण अनुभवाच्या तीन अंगांपैकीं दोन अंगें विचारांत न घेणें एवढाच रससिद्धान्ताचा दोष नव्हे. अनुभव ही गोष्ट कुठच्या स्वरूपाची आहे त्याचा पत्ता संस्कृत शास्त्रकारांना नव्हता. अनुभव म्हणजे कांहीं एकसमयावच्छेदें निर्माण झालेल्या संवेदना, भावना व विचार ह्यांची गोळाबेरीज नव्हे. ह्या तीन गोष्टी परस्परांना चिकटलेल्या असतात, म्हणूनच केवळ त्या एकसंध असतात असें मीं म्हटलेलें नाहीं. अनुभवाला हीं तीन अंगें असतात. पण हीं तीन अंगें असणें ह्याहून अनुभवांत कांहींतरी एक निराळा गुण असतो.

## अनुभवाची एक विशिष्ट संगति

अनुभवांत एक संगति असते. त्याला एक आकार असतो. त्याला कांहीं अर्थ असतो. मनावर होणाऱ्या संस्कारां ( impressions ) चा अर्थ लावण्याच्या मनाच्या प्रयत्नांतून अनुभव निर्माण होतो. ही संगति कशी लागते ? ह्या अनुभवाचें स्वरूप काय असतें ? ही संगति निर्माण करायची जी मनाची शक्ति तिला कल्पनाशक्ति असें म्हणता येईल. आणि ही कल्पनाशक्ति कल्पनाचित्रें निर्माण करून ही संगति लावते.

ही संगति अर्थात् एका विशिष्ट प्रकारची असते. इतर प्रकारच्या संगती देखील मानवी मन लावतें. 'All men are mortal' ह्या वाक्यांत देखील एक संगति लावण्यात आलेली आहे. All men ही एक संज्ञा ( concept ) व mortal ही दुसरी संज्ञा ह्यांचें येथें एक नातें जोडण्यांत आलेलें आहे. पण हें नातें संज्ञांचें आणि म्हणूनच तार्किक आहे.

पण ' गुलमोहर मोहरला ' ह्या पाडगांवकरांच्या प्रतिमेंत कांहीं ' गुलमोहर ' ह्या संज्ञेचें ' मोहरणें ' ह्या संज्ञेशीं नातें जोडलेलें नाहीं. किंबहुना, येथें एका गोष्टीचें दुसऱ्या गोष्टीशीं नातें जोडलें आहे असें म्हणणेंच कांहींसें चुकीचें आहे. येथें दोन नव्हे अनेक गोष्टी एकजीव झाल्या आहेत. नातें जुळण्याच्या पलीकडचें कांहींतरी झालें आहे. एक प्रतिमा निर्माण झाली आहे. मनावर झालेल्या संस्कारांचें अनुभवांत रूपांतर झालें आहे.

साहित्यांत भावना असतात व शास्त्रांत विचार असतात असें म्हणून साहित्य व शास्त्र ह्यांतला भेद व्यक्त होणार नाहीं. कारण काव्यांत विचार असतो व वैचारिक वाङ्मय वाचून भावना उद्दीपित होऊं शकतात. मानवी मनाच्या संगती अगर अर्थ लावण्याच्या प्रयत्नांतूनच दोन्ही निर्माण होतात. पण साहित्य एका प्रकारची संगति लावतें व शास्त्र दुसऱ्या प्रकारची संगति लावतें हा त्यांतला भेद आहे. हा जो भेद आहे आणि एक विशिष्ट प्रकारची संगति निर्माण करणें हा जो साहित्याचा प्रधान गुण आहे तो रससिद्धान्ताच्या द्वारें स्पष्ट होत नाहीं. आणि हाच रससिद्धान्ताचा मूलभूत दोष आहे.

## अलंकार निराळे काढणें चूक

वरील विवेचनावरून आणली एक गोष्ट स्पष्ट होते. ती अशी कीं अनुभव म्हणजेच प्रतिमा. प्रतिमा हें अनुभव व्यक्त करायचें साधन नव्हे. आधीं अनुभव घ्यायचा आणि मग तो व्यक्त करण्याकरितां चांगल्या चांगल्या प्रतिमा शोधून काढायच्या, चांगलें तंत्र वापरायचें असा प्रकार साहित्यिक करीत नाहींत. तेव्हां अलंकारांना अलंकार म्हणणेंच मुळीं चुकीचें आहे. अलंकारशास्त्र अशी एक निराळी गोष्ट असूंच शकत नाहीं. अलंकारांचे शेंकडों विभाग पाडणें हें अर्थशून्य आहे. साहित्यांत सजावटीचा असा कांहीं भाग नसतोच. पण रससिद्धान्त मात्र असा गैरसमज निर्माण करतो कीं रस व त्याच्या निर्मितीला पोषक असे अलंकार अशा दोन भिन्न गोष्टी अस्तित्वांत आहेत.

शिवाय, अलंकारशास्त्रांत देखील उपमान व उपमेय असा भेद करण्यांत आलेला आहे. असा भेद करणें हें अनुभववाद्यांच्या दृष्टीनें सयुक्तिक ठरणार नाहीं. कारण प्रतिमा निर्माण झाली कीं उपमान व उपमेय अशा भिन्न गोष्टी शिल्लक रहात नाहींत तर एक तिसरीच गोष्ट निर्माण होते. ही नवीन निर्माण झालेली गोष्ट व्यक्त करणें हेंच प्रतिमेचें कार्य. मनावर घडलेल्या ज्या भिन्न संस्कारांतून ती संगति निर्माण झाली, त्या संस्कारांना कारणीभूत झालेल्या वस्तूंचा निर्देश करण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. नव्हे तसें केल्यानें प्रतिमेचें स्वरूप बिघडून जातें. मागें नवकाव्यांतील दुर्बोधता ह्या विषयावर लिहितांना श्री. रा. श्री. जोग







ह्यांनीं नवकवी उपमेय कुठचें व उपमान कुठचें तें स्पष्ट करीत नाहींत अशी तक्रार केली होती. तिला उत्तर देतांना मीं वर दिलेलाच युक्तिवाद केला होता.

## जागृति नव्हे, नव निर्मिति

आतांपर्यंतच्या विवेचनांतून आणखीहि एक गोष्ट स्पष्ट झाली आहे. ती अशी कीं साहित्यांतून जो अनुभव व्यक्त होतो ती एक निर्मिति असते. कलाकृति ही एक निर्मिति असते असें रससिद्धान्ताच्या द्वारें सिद्ध होत नाहीं अगर सूचित होत नाहीं, हा त्याचा एक मोठाच दोष आहे. रससिद्धान्ताप्रमाणें, रसपदवीला पोंहोचणाऱ्या भावना ह्या प्रत्येक व्यक्तीच्या मनांत असतातच. त्या भावना जागृत करून त्यांना रसस्वरूप प्राप्त करून देणें हेंच फक्त कवीचें कार्य. ह्यांत कवीकडे भूमिका येते ती निर्मात्याची नव्हे तर एक पूर्वनियोजित आणि ज्ञात असा परिणाम आपल्या कसबानें घडवून आणणाऱ्या कारागिराची. संस्कृत साहित्यांत जो कसबाचा अतिरेक अनेक ठिकाणीं आढळून येतो त्याचें मूळ कारण तत्कालीन साहित्यशास्त्रांत आढळतें.

साहित्यिक हा अनुभव व्यक्त करतो असें प्रतिपादणारे लोक असेंहि म्हणत असतात कीं तो अनुभव निर्माण करतो. किंबहुना अनुभव व्यक्त करणें म्हणजेच तो निर्माण करणें. कारण अनुभव व्यक्त केल्याशिवाय त्याची निर्मिति पूर्ण होत नाहीं. निराळ्या शब्दांत सांगायचें म्हणजे प्रतिमा निर्माण होणें म्हणजेच अनुभवाची निर्मिति होणें व अभिव्यक्ति होणें.

साहित्यिक निर्माता असतो ह्याचा अर्थ असा नव्हे कीं जेथें कांहींच नव्हतें तेथें तो कांहींतरी निर्माण करतो. परमेश्वरानें शून्यांतून जसें विश्व निर्माण केलें त्याप्रमाणें कांहीं साहित्यिक अनुभव निर्माण करीत नाहीं. संवेदना, भावना, विचार हा कच्चा माल त्याला वापरावा लागतो. आणि सगळ्याच माणसांजवळ हा कच्चा माल असतो. पण ह्या कच्च्या मालांतून साहित्यिक काहींतरी नवीन निर्माण करतो. तो ह्या कच्च्या मालाचें निव्वळ स्वरूप बदलत नाहीं, केवळ त्याला रसस्वरूप प्राप्त करून देत नाहीं; तर जो अनुभव, जी प्रतिमा, जी संगति पूर्वी अस्तित्वांत नव्हती ती तो निर्माण करतो.

साहित्यिक हा निर्माता आहे हें एकदां मान्य केलें कीं त्याच्या व्यक्तिमत्त्वाला साहित्यचर्चेंत फार महत्त्वाचें स्थान प्राप्त होतें. आणि आजच्या टीकाशास्त्रांत हें कवीच्या व्यक्तिमत्वाचें महत्त्व मान्य करण्यात आलेलें आहे. पण टीकाकार जर रससिद्धान्ताला चिकटून राहिला तर कवीच्या व्यक्तिमत्त्वाला त्यानें महत्त्व देणें सयुक्तिक ठरणार नाहीं; त्यानें कवीच्या कारागिरीला महत्त्व देणें हेंच अधिक योग्य ठरेल.

## रस किती ही चर्चा अनावश्यक

साहित्यिक हा अनुभव निर्माण करतो असें म्हटल्यावर रस आठ कीं नऊ कीं दहा ह्या वादविवादांत कांहींच अर्थ उरत नाहीं. कारण साहित्यिक जो अनुभव निर्माण करतो तो निव्वळ भावनात्मक नसतो. तेव्हां त्यांत कुठचा रस आहे हें सांगून त्याचें स्वरूप स्पष्ट होत नाहीं. दुसरें असें कीं साहित्यिकाच्या प्रतिभेची उंची त्यानें नवीन काय निर्माण केलें त्यावरून ठरायची असते. त्यानें शृंगाररस निर्माण केला किंवा वीररस निर्माण केला असें म्हटल्यानें त्यानें नवीन कांहींतरी निर्माण केलें आहे असें मुळींच सिद्ध होत नाहीं; सिद्ध इतकेंच होतें कीं त्यानें एक ज्ञात रस पुन्हां एकदां निर्माण केला.

खरें म्हटलें म्हणजे साहित्यिक हा आपल्या कलाकृतींतून एक नवा अनुभव व त्याचा भाग असलेली अशी एक नवी भावना निर्माण करतो. माणसाला भावना असतात ह्याचा अर्थ असा नव्हे कीं त्याच्या हृदयांत नऊ निरनिराळ्या पिपांत नऊ भावना भरून ठेवलेल्या आहेत व त्या निरनिराळ्या प्रसंगीं उचंबळून येतात. त्याचा अर्थ इतकाच कीं आपल्या मनांत भावना निर्माण होऊं शकतात. प्रत्येक विशिष्ट अनुभवाचा भाग म्हणून एक विशिष्ट भावना माणसाच्या मनांत निर्माण होते. ह्या निर्माण होणाऱ्या भावनांचें स्थूल असें वर्गीकरण आपल्याला करतां येईल. पण नवीन निर्मिति करणें हें जेथें कवीचें वैशिष्ट्य तेथें त्याची नवी निर्मिति कांहीं अंशीं अमक्या एका ज्ञात गोष्टीसारखी आहे असें म्हणणें अर्थशून्य व निरुपयोगी ठरतें. तेव्हां रस किती ही चर्चा म्हणजे रससिद्धान्ताचा अगदीं अनावश्यक व दिशाभूल करणारा भाग आहे.

---







# ( १ ) प्राचीन काळापासून सतराव्या शतकापर्यंत : श्री. प्रभाकर माचवे

# मलयालम् साहित्याचा संक्षिप्त इतिहास

## केरळ : भूगोल व इतिहास

सह्याद्रि व अरब आखाताच्या मधील कन्याकुमारी ते गोकर्णापर्यंतच्या प्रदेशाचें नांव केरळ. लोकश्रुति अशी कीं कन्याकुमारीखालीं चाळीस मैलांपावेतों भूभाग होता. वरचा बराचसा प्रदेश कर्नाटकांत मिळाला. आतां कन्याकुमारी तें काञ्जीरोड हा प्रदेश मल्याळी भाषाभाषिकांचा. त्यांत कोचि ( कोचीन ), तिरुवितांकुर ( त्रावन्कोर ), उत्तरी मलबार हे प्रदेश येतात. या प्रदेशाला मलइनाडु, चेरनाडु व भार्गवक्षेत्रहि म्हणत असत. याला चेर वंशाच्या राजांचें तल (स्थळ) म्हणजे चेरतलहि म्हणत. 'च' चे 'क' रूपांतर होऊन संस्कृतांत केरल नांवच प्रचलित झालें. कैरली भाषेंत 'मलै' म्हणजे पर्वत. 'मलैनाडु' म्हणजे पर्वतांचा देश. 'मलै' व 'आली' (=समुद्र) म्हणजे पर्वत व समुद्र यांच्या मधला देश म्हणून मलयाली शब्द प्रचलित झाला. उत्तरेकडील कुणी सर्वप्रथम या प्रदेशांत आला असेल तर भृगुवंशीय परशुराम. हिंदुस्थानभरांत परशुरामाचें फक्त एकच जुनें देऊळ आहे व तें दक्षिण केरळांतच आहे.

प्राचीन काळीं द्राविड देश आंध्र, कर्नाटक, चोल, पांड्य व चेर या पांच प्रदेशांत विभक्त असे. केरल चेरवंशीयांच्या राजवटींत असे. चेरवंशाचा आदिपुरुष पुण्यश्लोक प्रल्हादपुत्र महाबली होते. त्यांची राजधानी हल्लींच्या अरनाकुलम्पासून शंभर मैलावर 'तिरुक्कारूरकरा' ठिकाणीं होती. त्यानंतर चेरन् नांवाच्या प्रतापी सम्राटाच्या राज्यकाळीं ' तिरुवंचिकुलम् ' मध्यें ती स्थापित झाली. त्या काळापासूनच परदेशाशीं व्यापार बराच होत असे. कोडंगल्लूर एक प्रसिद्ध बंदर होतें. बंदराला मलयालम् भाषेंत नौकाशय म्हणतात. आर्य ब्राह्मण या प्रदेशांत गेलें त्यापूर्वी तेथें नागवंशाचे लोक राहात असत. त्यांच्यांत जातिभेद नव्हता. ते स्वतंत्र गणतंत्र होते. आर्य ब्राह्मण आल्यावर तेथील संस्कृतींत एक प्रकारें खंड पडला. अनुलोम-विवाह सुरूं करून ब्राह्मणांनीं तेथें वर्णभेद व कुलीनता-अकुलीनता सुरूं केली. ब्राह्मणांचे बारा संघ तेथील नागवंशीयांशीं लढूं लागले. शेवटीं केरळप्रदेश चार 'कषकं' किंवा जिल्ह्यांत वाटला गेला: पेरिंचेल्लूर, पयन्नूर, परंपूर व चेड्डन्नियूर. जिल्हानिहाय एक एक रक्षापुरुष असे व तो राज्यकारभार पाही. खिस्ताब्दापूर्वी ११३ व्या सालीं उदयबाणवर्मन् प्रथम 'पेरुमाल' ( श्रेष्ठ शासक ) झाले. व यानंतर साडेसातशें वर्षे पेरुमाल राजवंश राज्य करीत राहिला. त्यानें ब्राह्मणांना सामंत किंवा ' तळियातिरी ' बनविलें व हा प्रदेश ' ब्रह्म-क्षात्र-भूमि ' म्हणून सुखासमाधानानें सांस्कृतिक विकास करूं लागला. त्या काळीं तेथें मातृसत्ताक पद्धति असे व त्याला 'मेरिमेक्कताई' म्हणतात. अजूनहि नम्बुद्रि व इतर लोकांत ती पद्धति आहे. फक्त पेरुमाल वंश पितृसत्ताक असे. पेरुमाल राजे संस्कृतप्रेमी असत. व तेव्हांपासूनच मलयाल भाषा व साहित्यावर संस्कृतप्रभाव स्पष्टपणें दिसून येतो. केरलियांचा 'तिरुओणम् ' किंवा श्रावणोत्सव भास्कर रविवर्मन् नांवाच्या पेरुमाल राजानेंच सुरूं केला.

या राजानंतर राजशेखर चक्रवर्ती नांवाचा विद्याप्रेमी राजा झाला. हा संस्कृत व तामिळ भाषेचा विद्वान् होता. श्रीशंकराचार्यांच्या निर्याणानंतर सात वर्षांनीं या राजाचा मृत्यु झाला. या राजानें केरलियांचा शक कोलंबाब्द चालूं केला. खिस्ताब्दाप्रमाणें सन ८२५ म्हणजे प्रथम कोल्लवर्ष. याच सुमारास चिनी व्यापारीहि या ठिकाणीं येऊं लागले होते. सातव्या शतकांत चिनी राजाकडून उपहार म्हणून एक लाकडी खुर्ची पद्मनाभपुरम् राजवाड्यांत आहे. तेथील लाकडी स्थापत्यावरहि चिनी कारागिरीचा बराच प्रभाव दिसून येतो. नागवंशीयांचे ' नागर ' [ मलयाल भाषेंत नागर म्हणजे शिव; नागरकोविल ( शिवमंदिर ) नांवाच्या कन्याकुमारी ते त्रिवेंद्रम् वाटेवरील खेड्यांत प्रत्येक दुसऱ्या माणसाचें नांव शेषन् आहे, व वासुकीचें देऊळहि याच भागांत आहे.










अनुक्रमणिका

सर्पाच्या बिळांची पूजाहि येथेंच होते] झाले. ब्राह्मणांशीं शरीरसंबंध घडून त्यांचें पुढें नायर रूपांतर घडलें. पेरुमाल वंशाचा शेवट होईपावेतों केरळ छिन्नभिन्न झाला.

## भाषा

प्राचीन केरलीय साहित्याचा कालनिर्णय अत्यंत कठिण आहे. त्यामुळें भाषेच्या मुळाचाहि पत्ता लागणें कठिण. 'लीलातिलक' नांवाच्या अत्यंत प्राचीन मल्याळी व्याकरण-ग्रंथांत मल्याळी ही द्राविड गोत्राची भाषा आहे असें म्हटलें आहे. त्याच्या उलट 'कोवुण्णि नेदुङ्डाडी' नामक व्याकरण-ग्रंथकारानें मंगलाचरणांत म्हटलें आहे :

'संस्कृतहिमगिरिगलिता,<br>
द्राविडवाणी कलिन्दजामिलिता<br>
केरेलभाषागंगा<br>
विहरतु मे हृत्सरस्वती सदा संगा ।'

केरळ भाषेंतील शरीरावयवाची शब्द, घरगुती उपयोगाचे शब्द, पाळलेल्या प्राण्यांचीं नांवें, नात्यागोत्याचीं संबोधनें व नामें, संख्यावाचक शब्द, वाक्यनियम, क्रिया, लिंग, वचन, विभक्ति वगैरे संस्कृतापासून स्वतंत्र आहेत.

तामिळभाषीयांचा आग्रह असा कीं मल्याळी त्यांच्याच भाषेचें एक रूप. पाद्री गुंडर्टनें केरल-भाषेला तामिळ भाषेची धाकटी बहीण म्हणून म्हटलें आहे. द्राविड भाषांचें प्रथम व्याकरण प्रस्तुत करणाऱ्या काल्डवेलाच्या मतानुसार मलयालम् तमिल-भाषा-पुत्री आहे. ए. आर्. राजराजवर्मानेंहि त्यांचीच री ओढली आहे. पण तमिळांचा प्राचीन जैनलिखित ग्रंथ 'शिलप्पधिकारम्' यांत कैक मल्याळी शब्द कोठून आलेत? याचा अर्थ असा कीं केरलियांची आदिभाषा मल्याळी होती. पुढें चेरवंशीयांच्या राज्यकाळीं तमिळ-भाषेचा तिजवर प्रभाव पडला. व पुढें ब्राह्मणांच्या आधिपत्यानंतर संस्कृताचा.

कै. चेलनाट अच्युत मेनोन (मेननचा हा मल्याळी उच्चार) यांनीं कांहि प्राचीन अलिखित मल्याळी लोकगीतें गोळा केलीं आहेत. 'वट्टकन पाट्टकल्' ('उत्तरेकडचीं गाणीं') त्यांच्या या संग्रहाचें नांव. या संग्राहकाच्या मतें हीं गाणीं एक हजार वर्षें जुनीं आहेत. 'पानत्तोट्टम्' गीतांत देवी भद्रकालीची स्तुति आहे. त्यांत फार विचित्र उपमा आहेत. मूळ मल्याळी असें :

" मलु पोले पल्लु, कोकु पोले नावु कुन्नाणि पोले मुक्कु, कुण्ड किणटिल् मिन्नामिनिड, पोले कण्णिल् मिलि रंडुम्, पेरुंपापु कान्नु तूडुक्कयतु पोले कैय्युं कालुम्, ताऩ्नोरु मुतुकिन्नु विरुन्नु पोय वयरु, निरन्न पारप्पुरत्तु पाटवल्लि पटर्नारेप्पोले नारुं अरंपुं "

(अर्थ— "परशूप्रमाणें दांत, नांगरासारखी जीभ, खुंटासारखें नाक, खोल विहिरींतील काजव्यांप्रमाणें डोळयांचीं दोन बुबुळें, मेलेल्या अजगरासारखे हातपाय, खालीं वाकलेल्या पाठीजवळ पाहुण्याप्रमाणें गेलेलें पोट, पडवळाच्या वेलीसारख्या नाड्या इत्यादि.")

कांहीं लोक 'रामचरितम्' मल्याळम्चा जुना ग्रंथ मानतात व त्यावरून मल्याळी तामिळ-पुत्री असावी असें म्हणतात. पण वरील कालीगीताचा काळ या रामचरितापूर्वी तीन शतकांचा आहे. येथें काली पालवृक्षाच्या रूपानें पूजिलेली दाखवतात. हा वृक्षपूजेचा काल आहे.

मलयालम्-वाङ्मयाचा इतिहास चार खडांत मानतातः

१. प्राचीन : अतिप्राचीन काल तें आठवें शतक.<br>
२. द्राविडप्रभावकाल : आठवें तें चौदावें शतक.<br>
३. संस्कृत ,, ,, : चौदावें तें सतरावें शतक.<br>
४. आधुनिक काल : सत्राव्या शतकापासून आजपावेतों

## प्राचीन काल

केरल भाषेंतील प्राचीन वाङ्मय लोकगीतांच्या स्वरूपाचें आहे : तोट्टंपाट्टु, पुल्लुवनपाट्टु, निषलकुत्तपाट्टु, मावरितं पाट्टु (महाभारताचें गाणें), देशत्तुकूळि, आंडिकूत्तु, वल्लान्पाट्टु, मलंपाट्टु, तुम्मिपाट्टु, वंचिपाट्टु (नौकागीत) इत्यादि. पण या गाण्यांतील नव्वद टक्के गाणीं हल्लीं उपलब्ध नाहींत. कालीमातेच्या पूजनाच्या गाण्यांत रक्तबळी-(मल्याळींत त्याला 'रक्त-सेवा' म्हणतात) चा खूप उल्लेख आहे. 'अरूपिणी' देवीचें रांगोळीनें ध्यान काढण्याचींहि गाणीं आहेत. या रांगोळींत देवीची स्तनमंडळं तेवढीं दोन लहान धान्याच्या अर्धगोलाकार ढिगांनीं दाखवितात. 'तोट्टं' शब्द 'तोन्नल्' (अर्थात् मनांत येणें, ध्यान करणें) या धातूपासून बनलेला आहे. 'पाट्टु' म्हणजे गाणें. 'माक्कं पाट्टु' हें दुसरें अत्यंत प्रसिद्ध जुनें गाणें. उत्तरकेरळांत एक कुटुंब 'कटंकोट्टु'

नांवानें प्रसिद्ध होतें. सात भावांनंतर एक बहीण झाली. अत्यंत सद्गुणी आणि स्वरूपवती. तिचं नांव ठेवलं ' माक्कं '. आईबाप वारल्यानंतर ती विधवा झाली व भावांजवळ राहूं लागली. भावजयांना तें आवडेना. सारख्या त्या तिला घालूनपाडून बोलत. एकदां साती भाऊ कामाला बाहेर गेले होते. भावजया नदीवर स्नानाला गेल्या होत्या. मोक्कं विटाळशी होती, म्हणून ' दूरगृहां'त होती. या वेळीं तेल्यानें नारळाचें तेल आणलें. मोक्कंला त्या तेल्याशीं बोलणें करावें लागलें. घरांत कोणी आणखी नव्हतेंच. तेल घरांत ठेवून तेली गेला. भावजया आल्या व त्यांनीं मोक्कंचा तेल्याशीं अनैतिक संबंध आहे म्हणून भावांचे कान भरले. सर्वांनीं मिळून नणंदेचा छळ आरंभिला. सगळयांत धाकट्या भावाला व भावजयीला मोक्कंबद्दल सहानुभूति होती. त्यांनीं तिचे प्राण वाचवले. पण त्या स्वाभिमानिनीला जगण्यांत अर्थ वाटेनासा झाला. तिनें जवळच्या अरण्यांत जाऊन चारी मुलांना विहिरींत ढकललें व स्वतःहि त्याच विहिरींत प्राण दिला. तिची मर्मव्यथा शापवाणीच्या रूपानें या भावांभावजयांवर उलटली आणि कटंकोट्टु घरांत आग लागली. सर्व सहा भाऊ–भावजया रक्त ओकून मेले. फक्त धाकटा भाऊ व त्याची बायको जगली. नंतर माक्कं देवीच्या रूपानें पूजली जाऊं लागली. तिचें गाणें म्हणजे ' मोकं पाट्टु '.

या गाण्यांची भाषा प्रदेशभिन्नत्वामुळें वेगळी आहे. कोटंगल्लूरच्या दक्षिणेकडे गेले कीं भद्रकालीचें नांव 'कन्नकी' होतें. कन्नकी 'शिलप्पधिकारम्'च्या नायिकेचेंहि नांव आहे. शिलप्पधिकारम् खिस्ताब्द दुसऱ्या शतकांतील पण कन्नकीचीं हीं गाणीं त्याहूनहि जुनीं आहेत. या गाण्यांतून तमिळ शब्द मुळीं नाहींतच, 'ब्राह्मणी पाट्टु' हि भद्रकाली मंदिरांतून व नायर कुटुंबांतून 'कल्याणी'–( म्हणजे लग्नसमारंभ–) प्रसंगीं म्हणतात. याशिवाय गारुड्यांचीं गाणीं ' पुल्लुवन् पाट्टु ' किंवा ' सर्प पाट्टु ' नांवानें प्रसिद्ध आहेत. केरळांत जागोजागीं अधिष्ठानवन किंवा ' कावु ' नांवाचीं बिळं पूजनासाठीं ठेवलेलीं असतात. वासुकीमंदिरांत तर पुजारी बिळांत जाऊन आंतील माती वर आणतो व प्रसाद म्हणून वाटतो. या सर्पगीताचा एक नमुना पहा :

"अय्यो एडन्नु पोरुन्नेन कालसर्प मे ?  
मुट्ट विडुरिरिञ्ञिट्टु पोरुन्ने  
अय्यो कालियम्म ओरु कल्ललयिल्लो  
काक्कत्तोळ्ळायिरं मुट्टुयिट्टु ।  
नां नूर्रायिरं कुंजु विरियून्नु ॥ "

(अर्थ : "माझ्या कालसर्पा, तूं कोठून येत आहेस ? अंड्यांतून निघून आलों आहोंत. अरे बापरे ! कालीमाते ! येथें तर बसण्याजोगतें बीळहि नाहीं. नऊ हजार कावळयांएवढीं अंडीं घातलीं व त्यांतून चारपट शंभर हजार पिलं निघालीं. " )

या गीतांमध्यें ' निडलकुलु पाट्टु ' शत्रुसंहारावर आधारलेलें लोकगीत आहे. याचें मुख्य आख्यान महाभारत. पण त्यांत पुष्कळसें स्वतःचें कपोलकल्पितहि मिळविलेलें आहे. कौरवांना पांडवांचा उत्कर्ष सहन झाला नाहीं. त्यांनीं एका मलवासी केरलियाला बोलावलें व त्याला आज्ञा दिली कीं ' अभिचार-प्रयोग ' करून त्यांना 'कथावशेष' करून टाक. मलवासी आधीं 'नाहीं' म्हणाली. पण त्यानंतर त्याची इच्छा पूर्ण करायला राजी झाला. तो प्रयोग यशस्वी होऊन मलवासी अलंकार घालून घरीं जातो. त्याची पत्नी पांडवांकडे जाऊन त्या जादूटोण्यावर उतारा म्हणून परिहारकर्मं करते व त्या पांडवांना पुनरुज्जीवित करते. महाभारतांतील ' मयसभा ' व ' खांडव-वनदाह ' प्रकरणें या दृष्टीनें पाहण्यासारखीं आहेत.

कांहीं गीतांतून वीरप्रशस्ति आहे व समरांगणावर आपल्या पुत्रांना पाठविणाऱ्या मातांचा अदम्य उत्साह आहे. तानाजीच्या पोवाड्यांतील प्रसंगाशीं या मल्याळी मातेचे उद्गार ताडून पहा : 'युद्धांत समोरासमोर दोन हात होऊन मेलास तर तुला सोन्याच्या पालखींत आणीन. पण जर पाठीवर तरवारीचा वार खाल्लास व मेलास तर अनाथ शवाप्रमाणें पानांत बांधून फरपटत आणीन. तुझी शेषक्रिया करणार नाहीं, सुतक पाळणार नाहीं. '

## द्राविडप्रभावकाल

' रामचरितम् ' खिस्ताब्द सहाव्या शतकांतील सर्वांत जुना ग्रंथ. याच्या ग्रंथकाराचें नांव निश्चित ठाऊक नाहीं. भारतीय भाषांमध्यें मलयालम् भाषेंत फार जुनें गद्य आढळतें. मंदिरांमधून आपल्याकडील कीर्तनांप्रमाणें ' पाठकम् ' होत व त्यांत पुराणेतिहास, देवीभागवतम्, भारतम्, रामायणम्, भगवद्गीता-

गद्यम्, द्वादशवर्णकगद्यम् इत्यादि सांगत. त्या काळीं छाया-नाटकेंहि करीत. ' पावकूत्तु ' म्हणजे पुतळयांचा नाच याच्या इतिवृत्तकथनांत गद्य-पद्य व चंपूचा आश्रय घेत असत. पुराणिकांना ' चाक्यार ' म्हणत; तो कोणत्याहि जातीचा चाले.

' लीलातिलकम् ' हा व्याकरणग्रंथहि याच काळांतला. पेरुमालांच्या अभिषेकानंतर ' द्रमिल ' किंवा तमिल-प्रभाव कमी होत गेला, व मणिप्रवाल शैली ( अर्धसंस्कृत, अर्धमल्याळी काव्यरचना ) फार लोकप्रिय झाली. याच सुमारास ' शास्त्रकलि ' म्हणजे मध्यभागीं दिवा ठेवून त्याच्या भोंवतीं प्रदक्षिणा करीत गाणें व नाचणें प्रचलित झालें. यांतहि चार भाग आहेत : चारपाद ( एकप्रकारचें मंगलाचरण किंवा शिवस्तुति ), पान, अभिनय व हास्य. पान म्हणजे दिव्याच्या चारींकडे बसून गणेशस्तुति करणें. एक मडकें पालथें करून त्यावर ताल धरून असंबद्धपणें गाणें. दोन नंबुद्रि ब्राह्मण उभे राहून अभिनय व हस्तमुद्रा दाखवतात. व बऱ्याच थट्टामस्करीनंतर हा खेळ संपतो. हें अनुष्ठान शास्ता ( हरिहरपुत्र अय्यपनस्वामी ) यांना प्रसन्न करण्यासाठीं ४० दिवसाच्या व्रताच्या रूपानें केलें जातें.

याच काळीं ' चाक्यारकूत्तु ' व ' कूटिपाट्टम् ' या आणखी दोन नाट्य-गीत-नृत्य-पद्धती रूढावल्या. ब्राह्मण व नागवर्गांच्या शरीरसंबंधापासून जी प्रजा उत्पन्न झाली ती सर्व चाक्यार, नंत्यार, वार्यर, कैमल्, पिषारोडि व नंपि या अंतरालवर्गांतली. कूट्टियाट्टम् नृत्य चाक्यार, त्याची बायको नंङ्ङियार व कारभारी नंप्यार मिळून करतात. नंप्यार ' मिलाव ' नांवाचें वाद्य वाजवतो आणि नांदी म्हणण्याचें व सूत्रधाराचें कार्य करतो. कूट्टियाट्टम्साठीं पुराणांतील कथा निवडीत. कुलशेखर पेरूमालानें ' सुभद्रा-धनंजय ' व 'तपती-संवरणं' नाटक लिहिलें. चाक्यारकूत्तूमध्यें एकजण एकटाच नाट्यछटेप्रमाणें ' कथाकालक्षेपम् ' करतो.

कूट्टियाट्टम्मध्यें विदूषकाचें काम मोठें असे. तोलकवीच्या गीती यासाठीं प्रसिद्ध आहेत. उदाहरणार्थ, दोन गीती पहा :

' मुलञ्जासन सृष्टींकल विलङ्ङं चेर्जलोचने ।
पोतिप्पेण्णच्छूनो टोत्त मार्जद्वंद्वं विराजते ॥ '

' कमलासन ब्रह्मदेवाच्या सृष्टींतील शोभामयी कमलनयने ! तुझे दोन स्तन पर्वतांप्रमाणें शोभिवंत आहेत '.

' बहुशोऽप्युपदेशेषु यया मां नोक्कमाणया
हस्तेन स्रस्तशूर्पेण कृतमाकाशचेरितम् । '

('वारंवार माझ्याकडे पहात असतांना तिच्या हातांतील सूप खालीं पडलें व ती हवेंतच हातानें धान्य पाखडूं लागली' ) या दुसऱ्या गीतींत हालाच्या गाथासप्तशतीची छटा आहे.

याच काळीं तिरुवितांकुरच्या ' निरणं ' देशांत ' कण्णश्शन् ' नांवाचे कवि आढळतात. 'कण्णश्शन् ' म्हणजे ' करुणेश '. हे संस्कृत व मलयाळम् या दोन भाषांत रचना करणारे ' उभयकवीश्वर ' होते. यांचीं तीन मुलं महापंडित होतीं.

राम पणिक्कर– रामायणकर्ता

माधव पणिक्कर– भगवद्गीता-परिभाषक

शंकर पणिक्कर– भारतमूचा अनुवादक.

माधव पणिक्कराच्या ' भाषा-भगवद्गीतें 'त सातशें श्लोकांतील ३२५ चाच पद्यबद्ध अनुवाद केला असून कांहीं ठिकाणीं स्वतंत्र टीकाहि दिली आहे. हे सर्व ग्रंथ मुळांतील संपूर्ण स्वरूपांत उपलब्ध नाहींत.

चेरुश्शेरि नंबुद्रि हे या काळांतील एक अत्यंत श्रेष्ठ मधुर कवि. आपल्या वामनपंडितांप्रमाणेंच सुश्लोकरचनेंत हा चतुर. याचें 'कृष्ण-पाट्टु' अत्यत रसाळ आहे. या कवीबद्दल निश्चित कांहींच पत्ता नाहीं. ग्रंथारंभीं फक्त एवढाच उल्लेख आढळतो : ' कोलीचील्याचा राजा उदयवर्मा याच्या आज्ञेनें कृष्णभागवत कथा गीतसम्बद्ध करतो. ' हें काव्य एका विशेष गाथावृत्तांत आहे. त्याला आधुनिक कवि ' मंजरी ' म्हणतात. जयदेव, मीराबाई, सूरदास, विद्यापति-रामप्रसाद इत्यादींच्या रचनेची आठवण होते. 'वेणुगानवर्णना' ही फारच लोकप्रिय रचना आहे. चेरुश्शेरी म्हणतो कीं कृष्णाची बांसरी ऐकून " पुण्यशाली वनवृक्ष मधुमय पुष्पवर्षा करीत सन्मानपूर्वक शाखानिचय नम्र करीत उभे राहिले. शीघ्रगतीनें वाहणारी कालिन्दी स्तब्ध उभी राहिली. लहरींचा वेगळेपणा निमाला. चंचल जल स्थिरावलें. "

### संस्कृत-प्रभाव-काल व एळुत्तच्छन

या काळीं नाटक, चंपू, चित्रकाव्य, महाकाव्य, संदेशकाव्य इत्यादि पंडितमान्य पद्यरचना बरीच झाली.

या संदेशकाव्यांतून ' उण्णुनीली संदेश ' प्रसिद्ध आहे. कालिदासाच्या मेघदूताचेंच हें एक प्रकारचें अनुकरण. नायकाचें नांव सांगितलेलें नाहीं. यक्षिणीऐवजीं केरळीचा वटकंकूर प्रदेशाची ' उण्णुनीलि. ' पत्नीबरोबर झोपलेल्या एका नायकाला एक यक्षी ( जादुगारीण, चेटकीण ) घेऊन गेली. आकाशमार्गानें ' तिरु अनन्तपरम् ' वरून जात असतांना नायक जागा झाला. त्यानें नृसिंह-मंत्रजप केला. त्यामुळें त्याला यक्षिणीनें वाटेंतच सोडलें. आदित्यवर्मा राजाकडे यथोचित संदेशवाहक मिळाला हें पाहून त्यानें आपली कहाणी सांगितली. या काव्याच्या रचनाकाराचें नांव सांपडत नाहीं.

झामोरिन राजांचें पंधराव्या शतकांत प्राबल्य होतें. त्यांच्या पदरीं अठरा कवी होते. साडे-अठरावा कवि पुनम् नंबुद्रि मानला जाई. हा देशी भाषेंत रचना करी. इतर कवि संस्कृतांत लिहीत. या कवीचे चंपू फार प्रसिद्ध आहेत : भोज-चंपू, केरलीचंपू रामायणचंपू इत्यादि. या काळांत कैक चंपूकार झाले. कित्येकांबद्दल आतां माहितीहि मिळत नाहीं.

आपल्या पोवाड्यांसारखे ' पटप्पाट्ट ' किंवा समरगीत व वीरगाथा या काळीं आढळतात. उत्तर केरळांत ' वरकन्पाट्टुकल ' आहेत व दक्षिणेंत " हर्यक्ष समरोत्सव ". समरप्रिय अमरवंशाचीं यांत वर्णनें आढळतात. तिरुवितांकुरच्या इतिहासावर आधारलेलें 'हरविक्कुट्टिप्पिल्लयार' गाणें फार प्रसिद्ध आहे. नवरा युद्धावर जात असतांना पत्नी कित्येक अपशकुन तिला झालेले सांगते. पण तो ऐकत नाहीं. अभिमन्यु-वधाप्रमाणें हें कथानक आहे. नंतर बाजीप्रभु घोरपड्याप्रमाणें इरविचा शिष्य केलु नायर यानें गुरु-प्रतिष्ठेच्या रक्षणार्थ शत्रुशिबिरांत जाऊन गुरूचें शिर परत आणलें.

या काळांत अनेक ' कीर्तन ' प्रकार सांपडतात. यांत भाषेचा चमत्कारविशेष आढळतो. आपल्या पंडित कवींप्रमाणें यमकप्रधान रचनेचा एक नमुना म्हणून पुन्तानम् नम्बूदिरीच्या ' आनन्दनृत्तं ' चे कांहीं श्लोक पहा. यांत अंबाडी-(गोकुळ) तील एका लहान बाळाच्या लहान बांसरीचें, त्याच्या दोन्ही हातांतील लोण्याचें व नृत्याचें वर्णन आहे :

> ऋम्बाडी तन्निलोरुन्नि युंटंगिने ।
> उण्णिक्योरुण्णि कुल्लु मुंटंगिने ।
> उन्नित्तलकल् चिलम्पु मुंटंगिने ।
> उन्नि उरइले किंकिणी अंगिने ।
> उन्नि वयट्ट्ल चेरुमुंटंगिने ।
> उन्निकाल् रंडुं तुडुतुड अंगिने ।

या कीर्तनामध्यें वेदांतपर कीर्तनेंहि बरींचशीं आढळतात. ' ज्ञानपान ', ' श्रीकृष्ण-कर्णामृत ', ' स्वप्नस्वरस्तोत्रं ', ' कृष्णलीला अकारादि-स्तोत्रं ', ' अवतरणदशकं ', 'पार्वती-पाणिग्रहणं मांगल्यकीर्तनं', ' गिरिजाकल्याणकीर्तनं ', ' गुरुस्तवं ' इत्यादि प्रसिद्ध आहेत.

सन १५७७ मध्यें एका जेसुइट पाद्र्यानें मलयालम् छापखाना काढला. त्यांत ' कैथलिकमत प्रथम पाठ : प्रश्नोत्तरावली' छापलें. याच प्रकारें अन्य पुष्कळ खिस्ती कवी मल्याळ भाषेचे चांगले रचनाकार झाले. श्री. नारायण पणिक्कराच्या मतानुसार या काळांत भाषेची आशयसंपत्ति व ग्रंथसंपत्ति फार वाढली. संस्कृतांतील कित्येक ग्रंथांचें समश्लोकी मल्याळी रूपांतर या काळीं झालें व त्यामुळें शब्दभांडार वाढलें.

पण या काळांतील सर्वांत प्रसिद्ध कवि म्हणजे ' एळुत्तच्छन '. याचें रामायण हिंदींतील तुळशीरामायण, बंगालींतील कृत्तिवास किंवा तामिळमध्यें कम्बन् रामायणाप्रमाणें प्रसिद्ध आहे. वाल्मीकिरामायणापेक्षां यानें अध्यात्मरामायणाला आधार मानून, अंपलप्पुषेच्या राजाच्या आज्ञेवरून व मेल्पत्तूर नारायण भट्टतिरींच्या निर्देशावरून ही रचना केली. त्याच्यापूर्वी कण्णश्शन्चेंहि रामायण प्रसिद्ध होतें. पण एळुत्तच्छनच्या रचनेंत वेदांती तत्त्वज्ञानाची छटा जास्त आहे. एपुत्तच्छन्च्या रामावर बौद्धदर्शनाचा व अहिंसेचाहि बराच परिणाम झालेला दिसतो.

रामवनवासप्रसंगीं लक्ष्मण क्रोधाविष्ट होऊन आपल्या पित्याला व आईलाहि वाटेल तसें बोलतो :

> भ्रान्तचित्तं, जडं, वृद्धं, वधूजितं
> शान्तेतरं, त्रपाहीनं, शठप्रियं
> बन्धिच्चुताततनेयुं पिन्ने स्तान्
> परिपन्थिकळायुळ्ळवे ने युमोकवे
> अन्तकन् वीटिटन्नयच्चभिषेकमो—
> रत्तर मेन्नियं सधिच्चु कोळ्ळुवन् !
> कार्यमल्लात्तु चेइयुन्नताकिल्
> आचार्यनुं शासनं चेइकेन्नते वरू ।








अर्थ—" भ्रांतचित्त, जड, वधूजित, वृद्ध, निर्लज्ज पित्याला व त्याला साथ देणाऱ्यांना मी पकडून तुरुंगांत टाकीन किंवा वधहि करीन, पण अग्रजाचा राज्याभिषेक निर्बाधपणें करीन ! आर्यपुत्राचा म्हणजे ज्येष्ठ भ्रात्याचा अभिषेक करविण्याचें सामर्थ्य माझ्यांत आहे. अकार्य करणारा आचार्य असला तरी त्याला दाबून शासन करायला हवें."

[ वडील भावाला आर्यपुत्र म्हणणाऱ्या केरळांत व वऱ्हाडकडे फक्त वहिनीच नव्हे तर इतरहि आदरार्थी जेव्हां 'भाउजी', 'भावोजी' शब्दांचा व्यवहार करतात तेव्हां दोन्हींकडील मातृसत्ताक प्राधान्य असलेल्या प्राचीन काळासंबंधीं शब्दशास्त्र्यांनीं विचार करावा व हें साम्य पडताळून पाहावें. ]

परंतु क्रुद्ध लक्ष्मणाला एळुत्तच्छनचा राम बुद्धाप्रमाणें अहिंसेचा उपदेश देतो. तो म्हणतो– " क्रोधानें दुःख होतें. क्रोध संसारबंधन आहे. क्रोध कर्मक्षयकारक आहे. म्हणून बुद्धिमान् लोक क्रोध सोडतात. क्रोधी यमराज आहे, तृष्णा वैतरणी आहे संतृप्ति नंदनवन आहे, शांति कामधेनु आहे, हा विचार करून शांतीचें सेवन करावें म्हणजे दुःख होणार नाहीं." मूळ शब्द असे :

क्रोधमूलं मनस्तापमुंटाइवरुं
क्रोधमूलं नृणां संसारबंधनं
क्रोधमल्लो निजकर्मक्षयकरं
क्रोधं परित्यजिवक्केणं बुधजनं
क्रोधमल्लो यमनावरु निर्णयं
वैतरण्याख्यया कुन्नतु तृष्णयुं
संतोषमाकुन्नतु नंदनं वनं
संततं शान्तिये कामसुरभि केळ
चित्तिच्चु शान्तिये तन्ने भजिक्मनी
संतापमेन्नातोरु जातीयुंवरा ।

सगळ्यांत मोठी गम्मत रावणाच्या चरित्रचित्रणांत आहे. वाल्मीकिरामायणांतील रावण मूढ, कामी, विलासी, गर्विष्ठ, धूर्त आहे. पण एळुत्तच्छनचा रावण परमभागवत, नीतिनिष्ठ व दक्षिणनायक आहे. लंका–राजधानीचें व लंकेश्वराच्या राजसभेचें वर्णन फार बहारीचें व स्तुतिपर आहे. अध्यात्मरामायणाचा हा अनुवाद एखाद्या स्वतंत्र ग्रंथासारखा वाटतो.

एळुत्तच्छनचा दुसरा ग्रंथ महाभारत. हें महाभारत मूळ महाभारताचें संक्षिप्त संग्रहण आहे. संपूर्ण गीतेच्या उपदेशाचा प्रसंग चार ओळींत समाप्त केला आहे. त्या चार ओळी अशा– " त्यावेळीं जो उपदेश दिला तें सर्व उपनिषद् होतें. ज्ञानियांनीं त्याला गीता म्हटलें. हे कुरुनृवर, भय सोड व युद्ध कर. जें दिसून येतें तें सर्व मीच आहे." मूळ मल्याळम् असें आहे :

" उपरि अरुलिन मोषिकल् उपनिषत्ताकयल्
ओतिनार गीतयेन्नादराल् ज्ञानिकल्
कुरुनृवर भयमोषिक कुरु समरम् आञ्चनी
कुष्ठनायीडोला कण्डतेल्लां अहम् । "

एळुत्तच्छनच्या कृतींना किळिप्पाट्टु ( 'सारिकागीत' ) म्हणतात. सारिकेच्या स्वरूपांत सरस्वतीचें आवाहन करून कविराज तिला प्रश्न विचारतात व ती काकली, कलकांची, मणिकांची, मात्राकाकली, ऊनकाकली, द्रुतकाकली, केक, अन्ननड या आठ मात्रावृत्तांचा प्रयोग करते.

एळुत्तच्छनच्या अन्य कृती श्रीमहाभागवतम्, ब्रह्मांडपुराण, उत्तररामायण, देवीमाहात्म्यम्, चिन्तारत्नं, हरिनामकीर्तनम्, मुकुन्दाष्टकं, केरळोत्पत्ति इत्यादि आहेत. एळुत्तच्छन्चा मृत्यु सन १५५७ मध्यें झाला.

या काळांतील अन्य कवींमध्यें मेल्पत्तूर नारायण भट्टतिरि सामूतिरि यांचें नांव प्रमुख आहे. कुष्ठरोगांतून मुक्ति मिळावी यासाठीं त्यानें गुरुवायूर-क्षेत्रांत मंडळ (४१ दिवसाचें भजन) उपोषण केलें. त्या वेळेस 'भागवतम् दशमम् स्कन्धम्' कथा दहादहा पद्यांच्या शंभर सर्गांत निबद्ध केली. या काव्यास 'नारायणीय' म्हणतात. याचाच समानकालीन कवि, सन्तानगोपाल, ज्ञानपान, भक्तिरसायन इत्यादि काव्यांचा कर्ता पुन्तानम् नम्बूतिरी. पुन्तानम्च्या घरांत भांडणें होतीं व यामुळें तो घर सोडून वेदान्ताकडे वळला. अशी कथा आहे कीं पुन्तानम् आपली भाषाकृति 'श्रीकृष्णकर्णामृतं' विद्वच्छिरोमणि मेल्पत्तूर भट्टतिरीला दाखविण्यास गेले असतां भट्टतिरी म्हणाला – 'मला वेळ नाहीं'. या अपमानानें व्यथित होऊन पुन्तानम् मंदिराच्या बाहेरच्या ओसरींत झोंपला. रात्रीं भट्टतिरीचा वातव्याधि वाढला. तेव्हां स्वप्नांत येऊन "मोरपंखजटित मेघश्यामवर्णचिकुरबंधनयुक्त, सुवर्णकिंकिणी-अलंकृत, मंजुलसुंदरपीतांबरधारी, कनकपल्लवमृदुकरकमलांत मुरली असलेला कोमल व्रज-शिशु मणिनादाला पराजित करणाऱ्या स्वरांत म्हणाला : मेल्पत्तूरच्या 'विभक्ती'–








पेक्षां पुन्तानमची ' भक्ति ' मला अधिक प्रिय आहे. त्याची क्षमा माग म्हणजे रोगमुक्ति मिळेल. " पुन्तानमूला उतारवयांत पुत्रप्राप्ति झाली. पण एक वर्षाचा मुलगा झाला असतां अन्नप्राशनसमारंभांत अतिथींच्या स्त्रिआंच्या ढिगाऱ्याखालीं तो गुदमरून मेला. आईनें दुःखभरांत विहिरींत प्राण दिला. दुर्लक्षामुळें घर अग्निदेवतेनें गिळलें. अशा वेळीं पुन्तानम् एक चटई व पानदान घेउन बाहेर पडले. या वेळीं ' ज्ञानपान ' लिहिलें असें म्हणतात.

एलुत्तच्छन्-नंतरचा काळ वाङ्मयांत बराच अंधकारपूर्ण आहे. केरळवर्मा राजकेसरीनें रचलेल्या ' वाल्मीकिरामायण किळिपाट्टु'मध्यें रावण हा भद्रकालीचा पुजारी दाखवला आहे. याचा जो दुसरा ग्रंथ 'पातालरामायण' त्या मध्यें हनुमान् पाताळरावणाला जिंकण्यासाठीं जातो. पाताळरावणाच्या पोटांत आठ षट्पद आहेत; व त्यांना मारल्यावाचून रावणाचें हनन शक्य नसतें. हनुमान् सूर्योपासना करतो व नंतर पाताळांत जातो आणि मत्स्य ( मकरध्वजा ) नांवाच्या पुत्राबरोबर युद्ध करतो. केरलवर्म्यानें 'बाणयुद्ध' काव्यहि लिहिलें आहे. या काळीं वेदांत-मत जवळजवळ केरळभर प्रचलित झालें होतें. ' प्रबोधचंद्रोदया'च्या पद्धतीवर लिहिलेलें ' मोक्षदायकम् ' ( कर्ता अज्ञात ), वैराग्यदायकम् इत्यादि वाङ्मयकृती सापडतात. पण जवळजवळ दीडशें वर्षें केरळवाङ्मयांत यानंतर कांहींच विशेष झालें नाहीं. राजेलोकांत परस्पर युद्धें व राजवंशांतील वैर वाढत जात होतें.

## कथकलि

संस्कृत अध्ययनामुळें केरळांत नृत्य व नाट्यकला वाढली. चाक्यारकुत्तु व कूडिय्याट्टंचा प्रचार वाढला. याच काळीं केरळियांना अत्यंत प्रिय असलेलें कथकली नृत्य विकसित झालें. व त्याच्याभोंवती एक वाङ्मयप्रकार रूढ झाला. कथकलीचें मूळ काय असावें याबद्दल ऐकमत्य नाहीं. हें नृत्य मुळांत मंदिरांत होत असें व पुराणकथांवर आधारित असें. चाक्यार ( मंदिरांतील बडवे किंवा पुजाऱ्यांचे साथीदार ) यांचें ' कुत्तु ' (=नृत्य) म्हणून हें सुरूं झालें. ' अष्टपदीपाट्टम् ' पूर्वीपासून केरळांत चालूच होतें. या अष्टपदींतूनच ' कृष्णनाट्ट ' सुरूं झालें. कांहीं लोकांच्या मतें कोषिकोट्टु सामूतिरी राजानें कोट्टारकराच्या राजाच्या सांगण्यावरून आपल्या माणसांना हें कृष्णाचें नाटक करायला पाठविलें. स्पर्धेमुळें कोट्टारकराच्या राजानें ' रामनाट्ट ' रचलें. कृष्णनाट्टम् तेराव्या शतकांत व रामनाट्टम् जवळजवळ दीडशें वर्षांनंतर प्रचलित असावें. कथकलीवर या दोन्ही परस्पर भिन्न नाट्यांचा प्रभाव स्पष्ट आहे. कथकली हें नृत्य, वाद्य, गायन या सर्वांचा समवाय आहे. 'कुत्तु' किंवा 'कूडियाट्ट' चे विकसित रूप कथकली होण्यांत मध्यंतरीं बराच वेळ गेला असावा. कालियाट्ट व तीयाट्टम् इत्यादि याचीं पूर्वरूपें असावीं. याबद्दल निश्चित सांगणें कठीण. वस्तुतः शरीराचा अर्धा भाग उघडा ठेवणें पसंत करणारे केरळीय या 'कथकलीं ' त डोक्यापासून पायापर्यंत इतक्या वस्त्राभरणांनीं युक्त होऊन कां नाचतात याचें उत्तर देणें कठिण आहे.

कथकलीमध्यें नटवर्ग मूक अभिनय म्हणजे केवळ आंगिक अभिनय करतो. हा अभिनय पश्चात्तल संगीतानुसार असतो. ' आट्टकथा ' किंवा नाट्यकथा चौसष्ट आहेत. या सर्व पुराण-नायकांवर अवलंबून आहेत व त्यांत ' अप्रदर्शनीय ' अशी एकहि घटना नसते. युद्ध आणि वध हीं सर्व कथकलींमध्यें प्राधान्येंकरून असतातच.

कथकली-प्रदर्शनाचा मुख्य उद्देश भक्तिसंवर्धन व धर्मप्रचार हा होय. नाट्यांत आवश्यक असणारे साहित्यगुण यांत नसतात. प्रत्येक कथकलींत एक शृंगारमय दृश्य व एक युद्धदृश्य अवश्य असतेंच. या नृत्यासाठीं विशिष्ट प्रकारची रचना असते. ती श्लोकबद्ध किंवा पदबद्ध असते. श्लोकांचा उपयोग विष्कंभक व प्रवेशकासाठीं. एक प्रकारचें ' इंटरल्यूड ' या श्लोकांनीं साधलें जातें. मल्याळम् भाषेंत 'श्लोकांत संपव' म्हणजे 'थोडक्यांत सांग' असा वाक्प्रचार आहे. नटांचे परस्पर संवाद पदांतून होतात. श्लोक संस्कृतांत व पदें मणिप्रवाळ-शैलींत असतात. मणि म्हणजे संस्कृत शब्द व त्यांना ओंवणारे मल्याळम् शब्द मधूनमधून घातले कीं मणिप्रवाळ-शैली होते. कथकलीपदांबद्दल ही उक्ति प्रसिद्ध आहे:

संगीतमपि साहित्यं सरस्वत्याः स्तनद्वयं ।
एकमापादमधुरं अन्यदालोचनामृतम् ।।

श्लोक व पदांव्यतिरिक्त ' दंडक ' नांवाची गद्यरचनाहि मधूनमधून घातली जाते. श्रेष्ठसाहित्यगुणयुक्त अट्टकथा ज्या कवींनीं अत्यंत यशस्वी रीत्या लिहिल्या

त्यांचीं नांवें अशीं : कोट्टयत्तु तंपुरान, उण्णाइ वारियर, अश्वति तिरुनाल तंपुरान् आणि इरयिम्मन तंपि.

आरंभीं सुपारीच्या झाडाचे पुष्पस्तबक व निरनिराळे मुखवटे घालून हा नाच करीत. नटच स्वतः गात असे. पण वेट्टत्तुनाडूच्या राजानें कथकली-पद्धतींत परिष्कार केला. किरीट, रंगीत कपडे, धोतरें, नायक-प्रतिनायकाचे वेगळाले पोषाक त्यानेंच रूढ केले. चेंटा नांवाचा एक प्रकारचा तबला त्यांनींच आवश्यक भाग म्हणून आणला. अभिनेत्यांना चार गोष्टींचें स्वातंत्र्य आवश्यक होतें : कैय्यु ( = हस्तमुद्रा ), मय्यु ( शरीरावयवांवर अधिकार, स्नायु संयम ), आट्टम् ( = अभिनयचातुर्य ) आणि रसवासना. मल्याळींत भरतनाट्यशास्त्राच्या हस्तमुद्राच मान्य करण्यांत आल्या. प्रत्येक पदाच्या शेवटीं ' कलाशम् ' ( कळस कीं खलास ? ) नांवाचें नृत्य होतें. - त्याचा अर्थ त्या पात्राचा अभिनय संपला असें दर्शविणें. आट्टम् दोन प्रकारचें असतें. चोल्लियाट्टम् म्हणजे गाणें चाललें असतांना नाचणें व इळकियाट्टम् म्हणजे आठवणीच्या बळावर नाचणें. निरनिराळ्या रसांची अभिव्यंजना व दर्शकांना तन्मय करण्याची शक्ति यांना ' रसवासना ' म्हणतात.

कथकलीच्या पात्रांचे वेष पच्चा ( हिरवा ), कत्ति ( भयानक ), वेल्लताडी ( पांढरी दाढी ), कीर ( काळा ), महर्षिवेष इत्यादि असतात. कथकलीचे नायक देव किंवा देवत्वपूर्ण माणसें असतात. त्यांची वेषभूषा राजोचित असते. तोंडावर हिरवा रंग असतो. पांढरा या हिरव्याचाच भेद : महादेव, बलभद्र वगैरे गोऱ्या नायकांना लाल विडा व पांढरें प्रसाधन प्रमुख. ताडी रौद्ररसप्रधान कथापात्रांना व असुर-राक्षसांना सांगितली आहे. ' कत्ति ' ही त्यांचेंच दुसरें प्रसाधन. रौद्र-वीर रसाभिनयांत दाढी लाल असते. पांढरी दाढी हास्यरसाची द्योतक होय. हनुमान्, द्विविद वगैरे वानर पांढऱ्या दाढीचे, वाली-सुग्रीव लाल दाढीवाले. कीर किंवा काळा वेश किरात-किरातींचा. भीषण पात्रांचा प्रवेश अट्टहास, गर्जना, अललडुरनें व्यक्त करावयाचा. महर्षींना निराळा वेश नाहीं. जटाजूट व काळी दाढी असावयाची. शापादि देतांना यांना लाल दाढी असावी. ईश्वर-वंदना, रंगपूजा, रंगवंदना, गुरु-वंदना वगैरे पूर्वरंगाचे प्रयोग व अभिनयारंभीं व अभिनयावसानीं वंदनात्मक हस्तमुद्रा आवश्यक असतात.

' कृष्णनाट्टम् ' कथकली आठ दिवस चालते. त्यांत अवतारं, कालियामर्दनं, रासक्रीडा, कंसवधं, स्वयंवरं, बाणयुद्धं, द्विविदवधं, स्वर्गारोहणं इत्यादि असतात. ' रामनाट्टम् ' मध्यें आठ भाग असे असतात : पुत्रकामेष्टि, अवतारं, स्वयंवरं, विच्छिन्नाभिषेकं, खरवधं, बालिवधं, तोरण-युद्धं, राम-रावणयुद्धं. यांपैकीं वालिवध व तोरणयुद्ध ( लंकायुद्ध ) अलीकडे प्रचलित आहेत.

उण्णइ वारियरनें ' नलचरितं ' आट्टकथा लिहिली. महाभारताच्या अरण्यपर्वांतील ५२ ते ७८ अध्यायांची ही कथा चार भागांची नृत्यकथा बनून मल्याळींत आली. रघुनाथपंडिताच्या ' नलदमयंतीस्वयंवराख्या-नां'त व या रचनेंत बरेंच साम्य आहे. त्यांतील घनाक्षरी किंवा कटाव दंडकासारखा आहे.

' एलुपत्तिरंडु दिवसत्ते आट्टकथा ' (बहात्तर दिवसांची नृत्यकथा ) अनेक कवींनीं मिळून लिहिली आहे. यांत रविवर्मन् तंपि किंवा इरमिम्ममान तंपि यांचे कीचकवध, उत्तरा-स्वयंवर व दक्षयाग फार प्रसिद्ध आहेत. ( मराठीचा तंत्री शब्द मल्याळी तंपीच्या धात्वर्थाच्या जवळचा आहे ).

राजा श्रीरामवर्म्यानेंहि (इ.स. १७५८) अनेक कथकली-कथानकें लिहिलीं. मध्ययुगांत ही लेखनाची परंपरा टिकूं शकली नाहीं. नाच तेवढा उरला.

कुंचन नम्बियार हा कवि परिहासपूर्ण रचनेकरतां प्रसिद्ध आहे. राजा अम्बलप्पुष याच्या राजसभेंत एक परदेशी ब्राह्मण शास्त्री आले असतां कुंचन नंबियारच्या गुरुंस आव्हान दिलें गेलें. एका रात्रींच्या रात्रीं बारा सर्गांचें काव्य मणिप्रवाळ-शैलींत रचण्यास सांगितलें. या गुरूंचें नांव मट्टतरी. याच्या म्हणण्यावरून कुंचन यानें अकरा समर्थ लेखक समोर बोलावले व स्वतः एक सर्ग लिहिला. एक एक श्लोक प्रत्येकाला लिहवीत व नंतर स्वतः एक लिहीत. या रीतीनें एका रात्रीं ' श्रीकृष्ण-चरितं काव्यं ' त्यानें एका रात्रींत लिहिलें, अशी आख्यायिका आहे.

कुंचन नंबियारच्या रचनेंत मोरोपंतांप्रमाणें प्रासांची व श्लेषांची रेलचेल आहे. या कवीलाहि राजभवनांतून सम्मानित कवी, पंडित, कलावंत यांना रोज मिळणारा

सव्वादोन शेर तांदळाचा शिधा मिळत असे. पण ते वाटणारा ' पंडाल ' ( भंडारी ) एके दिवशीं फक्त दोनच शेर तांदूळ देवूं लागला. तेव्हां नंबियारनें याबद्दल तक्रार सरळ राजापावेतों पोंचविली :

रंडे कालेन्नु कल्पिच्चु, रंडे कालायि नेरखुं ।
उंडो कालेन्नु पंडाल, उंडिह्लिन्निनेरखुं ॥

( " हुकुम मिळाला होता कीं ' रंडे काल् ' म्हणजे सव्वादोन मिळावे. आज ' रंडे काल् ' म्हणजे दुपारचे सव्वा दोन वाजले तरी पंडाल अजून विचारतोच आहे कीं ' काल् ' ( सव्वा ) कुठें आहे ? अजून जेवूं शकलों नाहीं. " )

राजानें या काव्यावर खूष होऊन परत सर्वांचे शिधे चालूं केले. नंबियारची प्रसिद्धि तुल्लल या गीतनृत्यरचनेबद्दल विशेष आहे. यांत सामाजिक उपरोध व टीका अधिक असते. अठराव्या शतकांत सामंतव्यवस्थेंत खूपच विलासिता व अधःपतन सुरूं झालें होतें. या वेळीं चाक्यार व नंबियार यांच्या परस्परसंघर्षांतून थुल्लल हा काव्यप्रकार जन्मास आला. शीतंकन्, परयन् व ओट्टन् अशा तीन वृत्तांचा बंध या प्रकारांत असतो. पहिलीं दोन्ही विलंबित लयींत व तिसरें द्रुत लयींत गायिलीं जाणारीं हीं मात्रा-वृत्तें होत. ' कुचेल ' म्हणजे सुदाम्याच्या चरित्रावर त्यानें लिहिलेलें थुल्लल अत्यंत लोकप्रिय आहे.

धनतृष्णेंत मग्न असलेल्या ब्राह्मणांवर नंबियारनें एका थुल्ललांत खूप कोरडे ओढले आहेत. 'सत्या-स्वयंवर' – थुल्ललांत तो म्हणतो : "ब्राह्मणांना पैशाची आठवण आली कीं बस्स ! म्हातारे तरुण होतात. काशीच्या पलीकडे जाऊनहि एक पैसा मिळत असेल तर ते तेथें जातील. अठ्याहत्तर वर्षांचा हा एक म्हतारा पाहा. ताटासारखें चमकणारें याचें खल्वाट (टक्कल) उन्हांत असें तापलें आहे कीं भडभुंज्यानें जर मूठभर धान्य त्यावर फेंकलें तर त्याच्या लाह्या व्हाव्या. छत्री नाहीं. फक्त एक काठी आहे. तीवर वांकून, खोकत वाटेंतील धुळीनें माखून येथवर आला. आणि आतां जर याला एक पै मिळाली नाहीं तर मात्र याच्या पोळलेल्या हृदयांतून अशी शापवाणी निघेल कीं त्यानें जणूं कोशलराज्य भस्म होऊन जाईल ! "

अशा तऱ्हेनें कुंचन नंबियारनें सामाजिक व्यंगावर कोरडे ओढून दंभस्फोट केला आहे. आजहि ' थुल्लल ' हा नृत्यप्रकार राजकीय पक्षादि निवडणुकीच्या वेळीं फार जोरानें उपयोगांत आणतात. हनुमान्–भीम–संवाद नांवाचें नंबियारचें ' थुल्लल ' फारच प्रसिद्ध आहे. त्याच्या कित्येक कवितांच्या पंक्ती ' तुका म्हणे ' प्रमाणें वाक्प्रचारांतील एक भाग म्हणून मल्याळी जनतेच्या लोकभाषेंत मिसळून गेल्या आहेत. कुंचन् म्हणतो : ' स्त्रीला धनाचाच मोह अधिक. पैसा असेल तर ती आदर करील. परंतु गुणांची तिला कांहीं किंमत नाहीं. ज्या दिवशीं पैसा संपेल तेव्हां त्या पुरुषाला स्त्री तृणवत् फेकून देईल. धोका देण्यांत स्त्री फार हुषार. ती चंचल व चपल आहे. ' मूळ मल्याळी असें :

' पणमुल्ल वने पोण्णिनु पेट्टू ।
गुणिमुट्ट वनिलो रादर विल्ला ।
पण्णु कोट्टिट्ट चेल्लात्तवनुं ।
तृणवुमवल् कोरु मेदवुमिल्ला । '

---

## भारावली चाल आज !

भारावली चाल आज
संथ पडते पाऊल
एका गोडशा स्वप्नाची
नाचे डोळ्यांत चाहुल

पहांटेच्या उन्हापरि
कांहीं आगळेंच तेज
गात्रागात्रांतुन तुझ्या
ओसंडत आहे आज

शब्दावांचुन बोलशी
कोण कुजबुजें कानीं
दारीं फुलला मोगरा
पहातेस भांबावुनी

— प्रकाशाचें बाळ जेव्हां
खेळें पूर्वेच्या कुशींत
आणि क्षितिजाच्या कळा
घोळविशी कल्पनेंत.

— तु. शं. कुलकर्णी

श्री. भि. वि. मराठे

# आइन्स्टीन व गुरुत्वाकर्षणाचा अर्थ

" The stars are not pulled this way and that way by mechanical forces; theirs is a free motion. They go on their way, as the ancients said, like the blessed gods " – Hegel ( 1842 ).

गुरुत्वाकर्षण हा शब्द उच्चारला कीं सर्वसाधारणपणें आपल्या डोळ्यापुढें वृक्षाखालीं बसून फळाचें अधःपतन अवलोकन करणारी तत्त्वचिंतनशील न्यूटनची मूर्ति उभी राहाते. गुरुत्वाकर्षण-शक्तीमुळें फळ खालीं पडतें असें आपण म्हणतों. सुमारें ३०० वर्षांपूर्वी न्यूटनच्या प्रतिभेंतून निर्माण झालेली ही गूढ, अद्‌भुत, अलौकिक शक्ति काय चीज आहे, तिचें स्वरूप काय, अर्थ नि कार्यकारणभाव काय या गोष्टी समजावून घेण्याच्या भानगडींत सहसा कोणी पडत नाहीं. फार थोड्यांना या संबंधींचें ज्ञान असतें. खरोखर वस्तुस्थिति अशी आहे कीं, न्यूटननें गणितशास्त्राधारें ह्या शक्तीचें प्रमाण मोजण्याचें समीकरण बसविलें खरें. पण तिचें स्वरूप काय, गुरुत्वाकर्षणाचा अर्थ व कार्यकारणभाव काय या गोष्टींचा त्यास उलगडा करतां आलेला नाहीं. आपण निर्माण केलेल्या या शक्तीच्या अशास्त्रीयतेविषयीं व अभिप्रेत असलेल्या तत्त्वज्ञानात्मक अडचणींविषयीं न्यूटनला पूर्ण जाणीव होती. ' पूर्ण चंद्रमा नभांत दिसतां सागरास कां ये भरती ? ' – याचें कारण गुरुत्वाकर्षण असें त्यानें सगितलें. पण, हजारों मैल दूर असलेल्या पृथ्वी आणि चंद्र यांच्यामध्यें आकर्षणाची ही माध्यमहीन अवकाशान्तर्गत क्रिया ( instantaneous action at a distance) तत्क्षणीं घडून यावी हें हास्यास्पद नव्हे काय ? दैवी चमत्कार, अलौकिकत्व, अद्‌भुतता यावरील श्रद्धेशिवाय हें शक्य नाहीं; आणि म्हणूनच लिबनिझ या तत्त्वज्ञानें न्यूटनवर तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत दैवी चमत्कार, अद्‌भुतता या गोष्टी घुसडल्यामुळें टीकास्त्र उचललें होतें. न्यूटनला या साऱ्या आक्षेपांची जाणीव होती. पण, केवळ सोयीखातर, कांहीं गतिशास्त्र-विषयक घटनांचा अर्थ लागतो म्हणूनच त्यानें गुरुत्वाकर्षणाचा सिद्धान्त प्रतिपादन केला. गुरुत्वाकर्षणाचें गूढ उकलून, त्याचें स्वरूप, अर्थ व कार्यकारणभाव या प्रश्नांवर ज्ञानदीप उजळून प्रकाश टाकण्याचें कार्य या शतकाच्या सुरवातीस, म्हणजे न्यूटननंतर अदमासें २५० वर्षांनंतर, डॉ. आइन्स्टीन यांनीं केलें. आइन्स्टीन यांनीं सोडविलेल्या या समस्येची पार्श्वभूमि व कार्यकारणमीमांसा पाहूं गेल्यास ते एक विलक्षण ज्ञानभांडारच आहे असें आढळून येईल. विज्ञान-तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत युगप्रवर्तक अशी ही घटना आहे. तत्त्वज्ञानाच्या प्रांतांत यामुळें क्रान्तिकारक परिणाम घडून आले आहेत.

## न्यूटनच्या सिद्धान्तांतील संदिग्धता

पृथ्वीवरून वर फेकलेल्या बस्तूचें अधःपतन, ग्रहगोलांचें सूर्याभोंवतालचें परिभ्रमण, विश्वांतील वस्तूंचें गतिशास्त्र या साऱ्या घटनांची मूळ प्रेरक शक्ति कोणती ही न्यूटनकालीन पदार्थविज्ञानापुढें प्रमुख समस्या होती. जडाचें जाड्य (Inertia) हें न्यूटनच्या गतिशास्त्राचें एक मूलभूत गृहीतकृत्य होतें. स्वतःच्या चलाचल स्थितींत स्थित्यंतर घडवून आणण्याचें स्वयंकर्तृत्व जडाच्या अंगीं नसतें; तो त्याचा स्वभावधर्म नव्हे. या मूलभूत गृहीततत्त्वाधारें न्यूटननें आपला सुप्रसिद्ध ' जडत्वाचा नियम ' ( Law of Inertia) किंवा गतिविषयक पहिला नियम ( First Law of Motion ) पुरस्कृत केला :

" बहिर्गत शक्तीच्या द्वारें स्थित्यंतर झाल्याविना, वस्तूची चलस्थिति स्वयमेव न पालटतां ती वस्तु तशीच सरळ, सूत्रबद्ध गतीनें प्रगत होत राहाते. तसेंच स्थिरस्थित वस्तूची स्थिरस्थिति स्वयमेव बदलूं शकत नाहीं. "

या नियमांतच न्यूटनच्या गतिशास्त्रांतील शक्ती-








( Force )ची व्याख्या अभिप्रेत आहे. न्यूटननें या शक्तीचें प्रत्यक्ष अवलोकन केलें नाहीं किंवा तिचा ( 'discover' ) शोधहि लावला नाहीं; ती त्यानें निर्माण केली ( 'invent' ). या शक्तीचें स्वरूप त्यास प्रकट करतां आलें नाहीं; पण, तिच्यामुळें वस्तूचें गतिमान ( Velocity ) बदलतें व गतिमानांतराचें प्रमाण त्या वस्तूच्या वस्तुमाना-( Mass )वर अवलंबून असतें या वस्तुस्थितीचें मात्र त्यानें अवलोकन केलें. आपणासहि हा अनुभव रोजच्या व्यवहारांत येतो. समप्रमाणांत जोर लावल्यास खटारगाडीपेक्षां बाबागाडी अधिक वेगानें ढकलतां येते; किंवा रबरी चेंडू लोहगोलापेक्षां जास्त वेगानें फेकतां येतो. यावरून, शक्ति ( Force ) व वस्तुमान ( Mass ) यांमध्यें प्रमाणशीर नातें आहे हें लक्षांत येतें. हा अनुभव लक्षांत घेऊन न्यूटननें आपला गतिशास्त्राचा दुसरा नियम (' Second Law of Motion ) प्रतिपादन केला आणि शक्ति ( F ) निश्चित करणारें समीकरण मांडलें :

" वस्तूवर क्रिया घडवीत असलेली शक्ति ( Force ) ही त्या वस्तूचें वस्तुमान ( Mass ) आणि त्या क्रियेमुळें वस्तूच्या गतिमाना-(Velocity मध्यें ) दर सेकंदास होणारा बदल ( म्हणजे वेगवृद्धिमान = Acceleration किंवा वेगक्षयमान = Retardation ) यांचा गुणाकार होय " ' $F = ma$ '

या नियमाचें वैशिष्ट्य असें कीं, शक्तीच्या रूपांत वस्तुमानाची आणि वस्तुमानाच्या रूपांत शक्तीची व्याख्या झाली. यावरून शक्ति किंवा वस्तुमान यांपैकीं कोणती तरी एक अनावश्यक कल्पना नव्हे काय, असा प्रश्न साहजिकपणेंच उपस्थित होतो. अर्थाचा संदिग्धपणा, द्व्यर्थता हा या व्याख्येचा दोष आहे.

## गुरुत्वाकर्षणाची एक सोयीस्कर उपपत्ति

वरील विवेचनांतील शक्तीचा संबंध न आणतां देखील, वस्तुमान ( Mass ) निश्चित करण्याचा मार्ग उपलब्ध आहे. वस्तूंच्या परस्पराघातप्रयोगा-(Collision Experiment)नें तें निश्चित होऊं शकतें. हें वस्तुमान म्हणजे वस्तूंतील वस्तूचें म्हणजे जडा- ( Matter )चें प्रमाण. खाणींत, गिरिशिखरावर, विषुववृत्तावर वा ध्रुवावर कोठेंहि तें सामान्यतः स्थिरमूल्य (Constant ) असतें. हें वस्तुमान वस्तूच्या गतिविरोध-शक्तीचें म्हणजे जडत्वाचें द्योतक होय. ' जाड्यात्मक वस्तुमान ' ( Inertial Mass ) हें त्याचें सार्थ नामाभिधान आहे.

न्यूटनच्या वर उल्लेखिलेल्या गतिशास्त्रीय नियमानुसार, सारख्याच जोरानें फेंकलेला रबरी चेंडू लोहगोलापेक्षां जास्त वेगानें जातो. पण गुरुत्वाकर्षणामुळें खालीं पडणाऱ्या वस्तूंच्या बाबतींत हा नियम खरा ठरत नसल्याचें दिसून आलें. केवळ गुरुत्वाकर्षणाच्या प्रभावामुळें खालीं पडत असलेल्या वस्तूंच्या गतिमानांत जो बदल होत जातो तो त्या वस्तूच्या वस्तुमाना-( mass ) वर अवलंबून नसतो. उदाहरणार्थ, भिन्नभिन्न वस्तुमान असलेले-एक बुचाचा व दुसरा शिश्याचा-असे दोन गोळे सारख्याच उंचीवरून स्थिरस्थितींतून किंवा सारख्याच गतिमानाच्या स्थितींतून निघून केवळ गुरुत्वाकर्षणामुळें पोकळींतून ( in vaccuo ) खाली पडूं लागले तर ते समान गतीनें, सारख्याच कालावधींत जोडीनें खाली पडत असतात. या घटनेचा प्रथम गॅलिलिओनें शोध लावला. न्यूटनच्या गतिशास्त्र-नियमाशीं ही घटना विसंगत होती. आडव्या पातळींत वस्तूचें जडत्व परिणामकारक ठरतें; पण, सरळ, उभ्या पातळींत तें तसें कां ठरत नाहीं ? न्यूटनला या रहस्याचा उलगडा करणें प्राप्त होतें. आपल्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमा-( Law of Gravitation )च्या आधारें या रहस्यावर प्रकाश टाकण्याचा न्यूटननें प्रयत्न केला.

" विश्वांतील प्रत्येक वस्तूवस्तूमध्यें एक प्रकारची गूढ आकर्षणशक्ति वास करीत असते. ती आकर्षिल्या जाणाऱ्या वस्तूंच्या ( गुरुत्वाकर्षणात्मक ) वस्तुमानाच्या गुणाकारास त्या दोन वस्तूंमधील अंतराच्या वर्गानें भागल्यास जो भागाकार येतो त्याच्याशीं प्रमाणबद्ध असते. "

येथें आकर्षिल्या जाणाऱ्या वस्तूंचें जें वस्तुमान कल्पिलें आहे तें जाड्यात्मक वस्तुमान (Inertial Mass) नव्हे; त्यास ' गुरुत्वाकर्षणात्मक वस्तुमान ' (Gravitational Mass) असें म्हटलें आहे. तें आकर्षण प्रयोगद्वारें निश्चित केलें जातें.

जड व हलक्या साऱ्याच वस्तू सारख्या उंचीवरून








निघून सारख्याच कालावधींत पृथ्वीवर पडतात, या घटनेची कारणमीमांसा न्यूटनच्या गुरुत्वाकर्षण-नियमानुसार पुढीलप्रमाणें आहे. पृथ्वीची ' निमंत्रक शक्ति ' ( calling force ) ही आकर्षिल्या जाणाऱ्या वस्तूच्या गुरुत्वाकर्षणात्मक वस्तुमाना- ( Gravitational Mass ) वर अवलंबून असते आणि त्या वस्तूची ' प्रत्युत्तरात्मक गति ' ( Answering Motion ) जाड्यात्मक वस्तुमाना- ( Inertial Mass ) वर अवलंबून असते. वस्तु हलकी असेल तर तिचें जाड्य ( Inertia ) म्हणजे गतिविरोधसामर्थ्य कमी; पण, त्या मानानें तिच्यावरील गुरुत्वाकर्षणाचा प्रभावहि तितकाच कमी असतो. तसेंच, वस्तु जड असेल तर गतिविरोधसामर्थ्य अधिक आणि त्या मानानें गुरुत्वाकर्षण-प्रभाव तितकाच अधिक. म्हणजे, गतिविरोध दूर करण्याइतक्याच पुरेशा प्रमाणांत गुरुत्वाकर्षणप्रभाव असतो. यावरून, गुरुत्वाकर्षण आणि जाड्य (Inertia) यांत एक प्रकारचा समतोलपणा असल्याचें दिसून येतें. दुसऱ्या शब्दांत सांगायचें म्हणजे, खालीं पडणाऱ्या वस्तूचें वेगवृद्धिमान (Acceleration) गुरुत्वाकर्षणात्मक वस्तुमानाच्या प्रमाणांत वृद्धिंगत होत असतें आणि जाड्यात्मक वस्तुमानाच्या प्रमाणांत कमी होत असतें; आणि ज्याअर्थी खालीं पडत असलेल्या साऱ्याच वस्तूंचें वेगवृद्धिमान स्थिरमूल्य ( constant ) असतें, त्याअर्थी गुरुत्वाकर्षणात्मक वस्तुमान व जाड्यात्मक वस्तुमान हीं समतोल असतात. गणितपद्धतीनें देखील याच निर्णयाप्रत पोहोंचतां येतें.

### आइन्स्टीननें दिलेला धक्का

गुरुत्वाकर्षणात्मक वस्तुमान आणि जाड्यात्मक वस्तुमान यांचा हा समतोलपणा केवळ श्रद्धा म्हणून सोयीखातर स्वीकारण्यांत आला होता. न्यूटनच्या कालापासून साधारण २५० वर्षेपर्यंत त्याचा अर्थ लागला नव्हता किंवा स्पष्टीकरण झालें नव्हतें. न्यूटनचे गतिशास्त्रविषयक व गुरुत्वाकर्षणविषयक नियम सुमारें २५० वर्षेपर्यंत पदार्थविज्ञानाचे आधारस्तंभ म्हणून गणले जात होते. पण, २० व्या शतकारंभीं ह्या आधारस्तंभास पहिला धक्का बसला. आपल्या प्रगल्भ प्रतिभेनें व प्रखर बुद्धितेजानें विज्ञान-तत्त्वज्ञानांत क्रांति घडवून आणणारा आइन्स्टीन न्यूटननें स्वीकारलेल्या कित्येक गृहीतकृत्यांविषयीं साशंक होता. गुरुत्वाकर्षण व जाड्य यांच्यांतील समतोलपणा ही केवळ नैसर्गिक यदृच्छेनें घडून आलेली घटना असावी हें त्याच्या शास्त्रीय व चिकित्सक बुद्धीला पटत नव्हतें. गुरुत्वाकर्षणशक्तीची माध्यमहीन अवकाशान्तगत तत्क्षणीं होणारी क्रिया ही कल्पनाच अलौकिक, अद्‌भुत व अशास्त्रीय म्हणून त्यानें त्याज्य ठरविली. वस्तूचा जाड्यात्मक गतिविरोध दूर करण्याइतपतच पुरेशा अशा गूढ शक्तीनें, अवकाशांत हात लांब करून पृथ्वी जणूं त्या वस्तूला ओढून घेते, असल्या दैवी चमत्कारावर त्याचा विश्वास नव्हता. या शास्त्रीय व चिकित्सक वृत्तींतूनच शेवटीं आइन्स्टीनच्या **गुरुत्वाकर्षण-सिद्धान्ताचा** जन्म झाला. त्यामुळें या अद्‌भुत, अलौकिक समजल्या जाणाऱ्या विश्वांतील रहस्यमय घटनेवर प्रकाश पडला. यामुळें आइन्स्टीननें शास्त्रीय ज्ञानांत अमोल भर घातली; तत्त्वज्ञानात्मक दृष्टिकोनांत क्रान्ति घडवून आणली; दूरदूर सरकणाऱ्या अंतिम सत्याच्या शिखराप्रत नेणाऱ्या प्रगतिपथावर कित्येक पाऊलें प्रगति केली.

' गुरुत्वाकर्षणात्मक वस्तुमान ' आणि ' जाड्यात्मक वस्तुमान ' यांच्यामधील समतोलपणा ह्या जडाच्या एकाच लक्षणाच्या दोन भिन्न संज्ञा असाव्यात, गुरुत्वाकर्षण हा जडत्वाचा आविष्कार असावा अशा तऱ्हेची कल्पना आइन्स्टीनसारख्या अचाट बुद्धिमत्तेच्या व चतुर कल्पकतेच्या व्यक्तीलाच सुचावी यांत नवल नाहीं. कांहीं काल्पनिक प्रयोगांच्या आधारें आइन्स्टीननें " गुरुत्वाकर्षण व जडत्व यांच्या तादात्म्या- ( Identity ) चें तत्त्व " या नांवानें प्रसिद्ध असलेला सिद्धान्त निश्चित स्वरूपांत मांडला ( १९१५ ). या तत्त्वाचें प्रायोगिक अधिष्ठान व सिद्धता म्हणून आइन्स्टीननें जे प्रयोग कल्पिले ते त्याच्या दिव्य कल्पकतेची व सर्जनशीलतेची साक्ष देतात. ' लिफ्टमधला माणूस ' ( The Man in the Lift ) असें त्या प्रयोगांचं सुप्रसिद्ध वर्णन आहे. लिफ्टमध्यें बसलेल्या माणसाला, लिफ्ट एकदां गुरुत्वाकर्षणक्षेत्रांत व एकदां जाड्यात्मकक्षेत्रांत आहे असें कल्पून, निसर्गनियमाविषयीं काय अनुभव येतात याचें त्या प्रयोगांत वर्णन आहे.

### सापेक्षतासिद्धान्त

या काल्पनिक प्रयोगांचा निष्कर्ष म्हणून आइन्स्टीननें








मांडलेलें ' गुरुत्वाकर्षण व जाडय यांच्या तादात्म्याचें तत्त्व ' म्हणजे आइन्स्टीनच्या ' सर्वसाधारण सापेक्षता-सिद्धान्ता'- ( General Theory of Relativity)चा आधारस्तंभ होय. या तत्त्वाचें सार असः जडत्वजन्य शक्तीमुळें होणारी गति ही गुरुत्वाकर्षणशक्तीमुळें निर्माण होणाऱ्या गतीपासून भिन्न आहे हें समजण्यास मार्ग उपलब्ध नाहीं. जडत्वजन्य, अनियमित, वक्रगती – ( Non – uniform, curve motion ) च्या बाबतींत निरपेक्ष असें कांहींच नाहीं. कारण, अशा गतीपासून उद्भवणारे परिणाम आणि गुरुत्वाकर्षणापासून उद्भवणारे परिणाम यांत फरक करतां येत नाहीं. गुरुत्वाकर्षण हें केवळ जडत्वा( Inertia )चेंच कार्य आहे; त्याचाच तो परिणाम आहे.

' गुरुत्वाकर्षण व जडत्व यांच्या तादात्म्याचें तत्त्व ' प्रतिपादून गुरुत्वाकर्षण हें जडाच्या जडत्वाचेंच कार्य आहे, तो जडत्वाचाच आविष्कार आहे या निर्णयाप्रत पोहोंचल्यानंतर, आइन्स्टीननें गुरुत्वाकर्षण या विश्वघटनेचा अर्थ, कार्यकारणभाव व स्वरूप स्पष्ट केलें, त्यांतील अभ्दुतता नष्ट करून त्याला लौकिकत्व प्राप्त करून दिलें.

न्यूटनचें गुरुत्वाकर्षणतत्त्व व आइन्स्टीनचें गुरुत्वाकर्षणतत्त्व यांत फार फरक आहे. आइन्स्टीनचें गुरुत्वाकर्षण ही एखादी ' शक्ति ' नव्हे. त्याच्या मतें वस्तू परस्परांना आकर्षितात ही समजूतच भ्रामक आहे– निसर्ग हा यंत्रात्मक ( mechanical ) आहे आणि त्या यंत्राच्या निरनिराळया भागांत एक गूढ, दैवी, आकर्षक शक्ति वास करीत आहे– या कल्पनेंतूनच हा भ्रम निर्माण झालेला आहे. पण विश्व हें कांहीं यंत्र नव्हे. आइन्स्टीनच्या गुरुत्वाकर्षणतत्त्वांत ' शक्ती'ला स्थान नाहीं. गुरुत्वाकर्षणप्रभावक्षेत्रांतील वस्तूंचा वर्तनक्रम हा ' आकर्षणशक्ती'वर अवलंबून नसून, वस्तू त्या क्षेत्रांत जो मार्ग अनुसरतात त्यावर अवलंबून आहे. गुरुत्वाकर्षण हें केवळ जडत्वाचें कार्य आहे. ग्रहगोलादि जडवस्तूंची गति व हालचाल ही त्यांच्या जडत्वाचाच स्वभावधर्म आहे; त्यांच्यांत ती गति प्रकृतिसिद्ध जात्याच आहे; आणि त्यांचे मार्ग दिक्कालसंताना-( Space-Time-Continuum )च्या मित्यात्मक ( Metric ) गुणधर्माधारें निश्चित केले जातात.

माध्यमहीन अवकाशान्तर्गत क्रिया–अवकाशांत एकमेकांपासून लाखों मैल दूर असलेल्या वस्तू परस्परांवर प्रभाव पाडून एकमेकांस आकर्षून घेतात, या अद्‌भुत कल्पनेनें शास्त्रज्ञांना गोंधळांत टाकलें होतें. लोहचुंबकत्व आणि विद्युत्तेजविषयक आकर्षणक्रिया समजण्याच्या बाबतींत देखील हीच अडचण होती. यानंतर क्षेत्रा– ( field ) ची कल्पना पुढें आली. लोहचुंबक स्वतःभोंवतालच्या प्रदेशांत जी एक विशिष्ट जडात्मक परिस्थिति निर्माण करतो, तिला लोहचुंबकाचें क्षेत्र ( magnetic field ) म्हणतात; आणि या क्षेत्रप्रभावामुळेंच लोखंड आकर्षिलें जातें. लोहचुंबकाचें क्षेत्र ही एक जडात्मक वस्तुस्थिति आहे. खालीं लोहचुंबक असलेल्या पुठ्यावर लोखंडाचा कीस पसरून या क्षेत्राला दृश्य स्वरूप देतां येतें. लोहचुंबकाचें क्षेत्र आणि विद्युत्तेजक्षेत्र यांची एक विशिष्ट रचना ( Structure ) आहे. क्षेत्र-समीकरणां- ( Field Equations ) च्या द्वारें जेम्स क्लार्क मॅक्सवेलनें या रचनांचें वर्णनात्मक स्वरूप प्रकट केलें आहे.

विद्युत्तेजक्षेत्र किंवा लोहचुंबकक्षेत्र यांच्याप्रमाणें गुरुत्वाकर्षणक्षेत्र ही सुद्धां एक वस्तुस्थिति आहे आणि आइन्स्टीननें क्षेत्रसमीकरणद्वारें त्या क्षेत्राचें स्वरूप प्रगट केलें आहे. ज्याप्रमाणें लोहचुंबक सभोंवतालच्या अवकाशाचे विशिष्ट गुणधर्म निर्माण करण्यास कारणीभूत होतो, तद्वतच ग्रहगोलादि वस्तूंच्या अस्तित्वामुळें त्या प्रत्येकाभोंवतालच्या अवकाशाचे विशिष्ट रचनात्मक गुणधर्म निश्चित होत असतात असें आइन्स्टीनचें अनुमान होतें. लोहचुंबकक्षेत्र ज्याप्रमाणें लोखंडाच्या किसाचा गतिपथ निश्चित करतें, त्याचप्रमाणें गुरुत्वाकर्षणक्षेत्रांतील वस्तूचा गतिपथ त्या क्षेत्राच्या भूमितीमुळें निश्चित होत असतो. आइन्स्टीनच्या गुरुत्वाकर्षणविषयक नियमावरून दिक्कालक्षेत्राचे रचनात्मक गुणधर्म कळतात; कांहीं नियमांवरून क्षेत्ररचना व गुरुत्वाकर्षित वस्तूचें वस्तुमान यांचा संबंध निश्चित होतो, तर कांहींवरून त्या क्षेत्रांतील वस्तूचा गतिपथ स्पष्ट होतो.

आइन्स्टीनच्या मतें काल व अवकाश यांना स्वतंत्र, निरपेक्ष अस्तित्व नाहीं; विश्व हें चतुर्मित्यात्मक दिक्कालक्षेत्र ( दिक्काल-पसारा ) [ Four Dimensional Space - Time Continuum ]

आहे. या दिक्कालसंयोगाची ( Space – Time Unity ) भूमिति युक्लिडपुरस्कृत भूमिति नव्हे. मिन्सोस्की नामक शास्त्रज्ञाच्या संशोधनामुळें आइन्स्टीनच्या सापेक्षता-सिद्धान्ताचा विकास होण्यास आणि गुरुत्वाकर्षणाचें गूढ उकलण्यास बहुमोल मदत झाली. आइन्स्टीननें मिन्सोस्कीचें हें ऋण मान्य केलें आहे. विश्वपसाऱ्याची भूमिति युक्लिडपुरस्कृत भूमिति नव्हे हें जरी खरें असलें तरी मिन्सोस्कीनें कल्पिली इतकी ती साधी नव्हती. म्हणून, आइन्स्टीननें रायमन या गणितशास्त्रज्ञानें पुरस्कृत केलेल्या भूमितीचा आपल्या सिद्धान्ताकरितां स्वीकार केला.

## युक्लिडची भूमिति गैरलागू

अवकाश- ( Space )ची भूमिति ही युक्लिड-पुरस्कृत भूमिति आहे हें न्यूटननें गृहीत धरलें आणि या गृहीतकृत्यावरच त्याचें गतिशास्त्र अधिष्ठित होतें. न्यूटनची ' सरळ रेषा ' युक्लिडपुरस्कृत सरळ रेषा होय. दोन बिंदूंमधील सर्वांत कमी अंतर अशी सरळ रेषेची व्याख्या आहे. घन-गोलाच्या पृष्ठभागावरील दोन बिंदूंमधील कमींत कमी अंतर वर्तुळाच्या परिघाचा भाग ( Arc ) हें असतें. गोलाच्या पृष्ठभागावर युक्लिड-भूमितीचे नियम लागू होत नाहींत. त्यावर काढलेल्या त्रिकोणाच्या तीन कोनांची बेरीज दोन काटकोनांबरोबर नसते. निष्कर्ष असा कीं, सपाट पृष्ठभागावरील ' सरळ रेषा ' निराळी आणि वर्तुलाकार पृष्ठभागावरील ' सरळ रेषा ' निराळी. पृष्ठभाग हा द्विमित्यंगात्मक ( Two-Dimensional ) अवकाश आहे. अर्थात् द्विमित्यंगात्मक अवकाश युक्लिडच्या रीतीचा किंवा तदितररीतीचा असे भिन्न भिन्न असूं शकतात. द्विमित्यंगात्मक, त्रिमित्यंगात्मक, चतुर्मित्यंगात्मक अशा प्रत्येक अवकाशांत अशी एक रेषा असूं शकेल कीं जी त्या अवकाशाच्या स्वरूपानुसार त्या अवकाशांतील युक्लिडानुसारी वा युक्लिडेतर सरळ रेषाच असेल. अशा या युक्लिड व निर्युक्लिड ' सरळ रेषां 'चें ' भूरूपरेषा ' ( Geodesic ) हें सर्वसाधारण नांव आहे.

युक्लिडपुरस्कृत एकच एक 'सरळ रेषा' गृहीत धरून चालणाऱ्या न्यूटनला ग्रहगोलादिकांच्या वक्र गतीचें कारण शोधण्याकरितां गूढ गुरुत्वाकर्षणशक्ति निर्माण करावी लागली. पण, जडत्व या प्रकृतिधर्मामुळें वस्तूची स्वाभाविक, सरळ, सुरळीत गति त्या त्या अवकाशाच्या विशिष्ट भूरूपरेषेनुसार असते, असें सर्वसामान्य विधान केल्यास गुरुत्वाकर्षणशक्तीचें गूढ निर्माण करण्याची गरजच उरत नाहीं. ग्रहगोलांचे गतिपथ हे त्यांच्या जडत्वामुळें आणि अवकाशाच्या भूरूपरेषेनुसार त्यांनीं अनुसरलेले स्वाभाविक मार्ग आहेत. तेथें कुणी दैवी, गूढ शक्ति मार्गदर्शन करीत नसते. निरनिराळ्या ग्रहगोलांचे गतिपथ भिन्नभिन्न असतात. त्या अर्थी त्यांच्या भूरूपरेषाहि भिन्न भिन्न असल्या पाहिजेत. पर्यायानें अवकाशाच्या निरनिराळ्या प्रदेशांची भूमिति निरनिराळी असली पाहिजे. अवकाशाची प्रादेशिक भूमिति ही त्या प्रदेशांतील जड पदार्थांच्या विभागणीवर अवलंबून असते. काल व अवकाश स्वतंत्र, निरपेक्ष आहेत आणि त्यांचे गुणधर्म जडाच्या अस्तित्वावर अवलंबून नसतात अशी जुनी समजूत होती. आइन्स्टीनच्या सिद्धान्तानुसार दिक्काल आणि जड पदार्थ स्वतंत्र, निरपेक्ष नाहींत. विश्व म्हणजे स्वतंत्र कालावकाशांत स्वतंत्र जडपदार्थ रचून बांधलेला अढळ इमला नव्हे. दिक्काल व जडपदार्थ यांचें अस्तित्व परस्परावलंबी आहे.

गुरुत्वाकर्षणशक्ति ही दिक्कालक्षेत्राच्या भूमितीचा स्वाभाविक आविष्कार आहे असा सिद्धान्त पुरस्कृत केल्यानंतर, आइन्स्टीननें त्या दिक्कालक्षेत्राच्या भूमितीचीं गुरुत्वाकर्षणफलदर्शक समीकरणें मांडलीं. याकरितां त्यानें रायमनच्या भूमितीचा उपयोग केला. सपाट पृष्ठभागाची गोलाच्या पृष्ठभागाशीं तुलना करतांना गोल पृष्ठभाग वक्र (curved) आहे असें आपण म्हणतों. तद्वतच, रायमनच्या भूमितीनें नियमबद्ध असलेलें दिक्कालक्षेत्र ( space-time Continuum ) ' वक्र ' असतें असें म्हणतां येईल. पण, दिक्कालाची ही वक्रता ( curvature ) सर्वत्र समान असते असें नाहीं. रायमनच्या भूमितीनुसार दिक्कालाच्या भिन्नभिन्न प्रदेशांत या वक्रतेचें प्रमाण भिन्नभिन्न असूं शकतें. गुरुत्वाकर्षण हा या वक्रतेचा परिणाम आहे. समुद्रांत संचार करणाऱ्या माशांमुळें ज्याप्रमाणें त्यांच्या भोंवतालचें पाणी खळबळतें, तसेंच दिक्कालक्षेत्रांतील ग्रहगोलादि जडाच्या वस्तुमानामुळें आणि गतीमुळें भोंवतालचा दिक्कालप्रदेश खळबळतो. यामुळें वक्रता येते आणि गुरुत्वाकर्षणक्षेत्र निर्माण होतें. गुरुत्वाकर्षण-







क्षेत्राची वक्रतात्मक रचना अर्थातच जडाच्या वस्तुमानावर व गतिमानावर अवलंबून असते. यावरून असा निष्कर्ष निघतो कीं विश्वपसाऱ्याची भूमित्यात्मक रचना ही विश्वांतील जडाच्या एकंदर वस्तुमानावर, त्याच्या विभागणीवर व गतिमानावर अवलंबून असते. जडाचें केंद्रीकरण जितकें अधिक तितकी दिक्कालप्रदेशाची वक्रता अधिक. सागरांतील बेटाभोंवती पाण्यांत जसे भोंवरे असतात, तसेंच प्रत्येक ग्रहगोलाभोंवतीं स्थानिक विस्कळितपणा, वक्रता ( curvature ) येते. कापसाच्या मऊ उशींत लोहगोल ठेवल्यास उशींत जशी वक्रता निर्माण होते तद्वतच दिक्कालप्रदेशांत ग्रहगोलादी जडांमुळें वक्रता येते.

### कांहीं तत्त्वज्ञानात्मक प्रश्न

या सिद्धान्तांतून कांहीं तत्त्वज्ञानात्मक प्रश्न उद्भवतात. जडपदार्थ मूलभूत धरला तर जडामुळें दिक्कालास वक्रता येते असें म्हणतां येईल. पण दुसरी विचारसरणि अशी कीं, वक्रतेमुळेंच जडाचें अस्तित्व जाणवतें कीं दिक्कालाची वक्रता जडाच्या अस्तित्वाचें कारण आहे ? जड हें दिक्कालाच्या वक्रतेचा आविष्कार आहे काय ? दिक्कालाला प्राकृतिक स्वाभाविक रचना आहे आणि जडाच्या अस्तित्वामुळें तिच्यांत फेरफार होतात कां दिक्कालाच्या सत्रंध रचनेचें कारणच जड आहे ? जडाविना दिक्कालाचें अस्तित्व असूं शकतें काय ? — या प्रश्नांना तत्त्वज्ञांनीं व शास्त्रज्ञांनीं दिलेल्या उत्तरांत एकवाक्यता नाहीं. आइन्स्टीनच्या मतें अवकाशाला स्वतंत्र अस्तित्व नसून, तें जडामुळेंच प्राप्त झालें आहे. जडाविना सारें विश्व शून्य होय. या तत्त्वज्ञानात्मक प्रश्नांत खोलवर शिरण्याचें हें स्थल नव्हे. परंतु, या प्रश्नासंबंधींच्या वैचारिक मंथनांतून आइन्स्टीननें विश्वरचना " मर्यादित, पण अपार " ( Finite, but unbounded ) असल्याचें तत्त्व प्रतिपादन केलें, या गोष्टीचा उल्लेख करणें योग्य होईल.

आइन्स्टीनचा गुरुत्वाकर्षणसिद्धान्त म्हणजे कल्पनाविलास किंवा गणिती आंकड्यांची जादू नव्हे. तो प्रायोगिक कसोटीस उतरला आहे आणि त्यामुळेंच त्यास महत्त्व व बळकटी प्राप्त झाली आहे. नाहींतर तो न्यूटनच्या सिद्धान्तापेक्षां साधा, सरळ, सुरेख, विश्वाच्या सुसंवादित्वाचा व सौंदर्याचा आविष्कार घडविणारा असूनहि त्याज्य ठरला असता. ज्या ज्या गतिशास्त्रीय घटनांचा अर्थ न्यूटनच्या सिद्धान्तानुसार लागतो तो आइन्स्टीनच्या सिद्धान्तानुसारहि लावतां येतो. येवढेंच नव्हे तर, ज्या कांहीं विश्वघटनांचें समाधानकारक स्पष्टीकरण न्यूटनच्या सिद्धान्तद्वारें होऊं शकलें नाहीं तें कार्य आइन्स्टीनच्या सिद्धान्ताला करतां आलें आहे. यांतच आइन्स्टीनच्या सिद्धान्ताचें श्रेष्ठत्व व यश आहे. सूर्याच्या सर्वांत जवळ असलेला मर्क्युरी नामक ग्रह इतर ग्रहांप्रमाणें नियमितपणें एकाच दीर्घवर्तुलाकार कक्षेंत फिरावयास हवा. पण, तसें न घडतां या ग्रहाच्या प्रदक्षिणेच्या दीर्घवर्तुलाकार कक्षेची समपातळी प्रतिवर्षी अल्पांशानें बदलत असते. न्यूटनच्या तत्त्वानुसार या घटनेचा बोध होत नाहीं. पण, सूर्याच्या गुरुत्वाकर्षणक्षेत्राची महान् तीव्रता, मर्क्युरीचें सूर्यसान्निध्य, त्याचा अफाट वेग व अल्पाकार, या कारणांमुळें त्या ग्रहाची गति वैशिष्ट्यपूर्ण आहे हें आइन्स्टीननें आपल्या सिद्धान्तान्वयें सिद्ध केलें.

प्रकाश ( light ) ही तेजशक्ति ( Energy ) आहे आणि त्याला वस्तुमान आहे. म्हणून, त्यावर गुरुत्वाकर्षणाचा परिणाम होणें अपरिहार्य आहे. आइन्स्टीनच्या सिद्धान्ताचें हें अनुमान प्रत्यक्ष प्रायोगिक कसोटीस उतरलें आहे. प्रकाशकिरण युक्लिडच्या सरळ रेषेंत प्रगत न होतां गुरुत्वाकर्षणक्षेत्रांतून प्रवास करतांना भूरूपरेषेनुसार त्यांच्या मार्गाचें वक्रीभवन होतें.

जडाच्या सान्निध्यांत जसें अवकाशाचेहि गुणधर्म बदलतात, तसेंच कालाचेहि बदलतात. गुरुत्वाकर्षणक्षेत्राचा कालावधीवरहि परिणाम होतो. पृथ्वीपेक्षां सूर्याचें वस्तुमान खूपच प्रचंड असल्यामुळें, म्हणजेच सूर्याचें गुरुत्वाकर्षणक्षेत्र फारच तीव्र असल्याकारणानें, सूर्यसान्निध्यांत ' कालप्रवाह ' पृथ्वीच्या ' कालप्रवाहा '—पेक्षां खूपच मंद असतो.

---

मानवाचें कर्म आणि त्याची नियति यांची सदैव चिंता वहाणारा अशी माझी परमेश्वराविषयींची कल्पना नाहीं. स्पिनोझा या तत्त्वज्ञानें परमेश्वराविषयीं अशी कल्पना मांडली आहे कीं सर्व मानवांत जी मधुर एकता ( harmony ) दिसून येते तेंच परमेश्वराचें स्वरूप होय. माझी परमेश्वराची कल्पना अशीच आहे.

—— आइन्स्टाइन










प्रा. रा. ना. जोशी

# आल्बर्ट आईन्स्टाईन

१८ एप्रिल १९५५ रोजीं प्रिन्स्टन येथें आइन्स्टाइन या महान् शास्त्रज्ञास देवाज्ञा झाली. भौतिक शास्त्रांतील जुन्या युगास जर न्यूटनचें युग म्हटलें तर चालू युगास आइन्स्टाइनचें युग म्हटलें पाहिजे. त्यांनीं वास्तव-( Physics ) शास्त्रांतील मूलभूत सिद्धान्तांत क्रांति घडवून आणली.

## अल्प चरित्र व व्यक्तित्व

आइन्स्टाइन यांचा जन्म जर्मनींतील व्यूर्टेम्बर्ग संस्थानांत ऊल्म या शहरीं १४ मार्च १८७९ या दिवशीं झाला. त्यांचे वडील विजेच्या सामानाचे कारखानदार होते. शाळेंत आइन्स्टाइन यांची इतर विषयांत मोठी प्रगति नव्हती. त्यामुळें त्यांचे सहाध्यायी त्यांना त्यांच्या नांवाप्रमाणें 'दगडोबा' ( ein= एक; stein = दगड ) असें म्हणत असत. १८९४ मध्यें त्यांचे वडील इटलींत रहावयास गेले त्यावेळीं आइन्स्टाईन यांना स्वित्सर्लंडमध्यें अभ्यासाकरितां ठेविलें. गणित व वास्तव या शास्त्रांत त्यांची चलती असे. झुरिच येथें पॉलिटेकनीक संस्थेंत काम करून ते विद्यालयांत आपला अभ्यास चालू ठेवीत. तेथेंच त्यांना पीएच्. डी. ची पदवी मिळाली. कांहीं दिवस ते बर्न येथील पेटंट ऑफिसांत इन्स्पेक्टरची नोकरी करीत होते. पुढें त्यांना झुरिच विद्यापीठांत अध्यापक नेमण्यांत आलें. ते १९०९ पर्यंत तेथें होते. १९०५ सालीं त्यांनीं सापेक्षतेचा विशिष्ट (संकुचित) (Special) सिद्धान्त पुढें मांडला. तत्पूर्वी त्यांनीं प्रकाशकणावर बरेंच संशोधन करून त्या संबंधीं नियम पुढें मांडले. तसेंच प्लांकच्या शक्तिकणांच्या उपपत्तीस अनुसरून पदार्थांच्या विशिष्ट उष्णतेचे नियम बसविले. त्याचप्रमाणें पाण्यामध्यें किंवा हवेमध्यें अत्यंत सूक्ष्म कण इकडून तिकडे कसे धावतात त्यांचेहि नियम शोधून काढले. त्यांचे हे सर्व शोध मूलगामी स्वरूपाचे व सर्वमान्य असले तरी त्यांची प्रसिद्धि त्यांच्या सापेक्षतावादामुळेंच झाली. कारण त्या सिद्धांतानें शास्त्रज्ञांच्या विचारसरणींत मूलगामी असा फरक घडवून आणला आहे. १९११ मध्यें कांहीं दिवस ते बोहेमियांत प्रागला होते. तेथून १९१३ सालीं बर्लिन येथील कैसर विल्हेल्म संस्थेमध्यें त्यांची नेमणूक झाली. १९१५ सालीं त्यांनीं सापेक्षतेचा सार्वत्रिक ( General ) सिद्धान्त पुढें मांडला. १९२१ सालीं त्यांना वास्तवशास्त्राचें नोबेल पारितोषिक मिळालें. १९३३ नंतर नाझी राजवट जर्मनींत आल्यावर ते ज्यू असल्यामुळें त्यांना जर्मनी सोडावी लागली व ते पुढें अमेरिकेंत स्थाईक झाले. प्रिन्स्टन येथील संशोधनकेंद्रांत त्यांची नेमणूक झाली, व शेवटपर्यंत ते तेथेंच होते. १९२९ मध्यें त्यांनीं संकलित सिद्धान्त पुढें मांडला व अगदीं अलीकडे सापेक्षतेचीच पण अधिक परिणत अशी नवी उपपत्ति पुढें मांडली. मरेपर्यंत त्यांच्या संशोधनांत कधींहि खंड पडला नाहीं. त्यांचें पहिलें लग्न त्यांच्या बरोबरच्या एका युगोस्लाव सहाध्यायिनीशीं झालें होतें. तिच्यापासून त्यांना दोन मुलें झालीं. त्यानंतर त्यांचा प्रथम-पत्नीशीं घटस्फोट झाला. पुढें त्यांच्या नात्यांतीलच एल्झाबाईशीं त्यांचा दुसरा विवाह झाला. त्याहि बरेच वर्षांपूर्वीं दिवंगत झाल्या.

आइन्स्टाइन यांचा स्वभाव अगदीं साधा, मनमिळाऊ व भिडस्त असे. त्यांना शास्त्रीय चर्चेखेरीज व्हायोलिन व पियानो वाजविण्याचा नाद असे. पैसा मिळावा अशी त्यांची बिलकूल इच्छा नव्हती. त्यांच्या गरजा अगदीं थोड्या होत्या. अमेरिकेंत गेल्यावर त्यांना पगार किती पाहिजे म्हणून विचारलें असतां त्यांनीं अगदींच थोडी रक्कम सांगितली. अधिकाऱ्यांनींच त्यांचें एवढ्यांत भागणार नाहीं म्हणून त्यांना अधिक पगार दिला. तसेंच ते अगदीं प्रसिद्धिविमुख होते. एकदां त्यांना अमेरिकेंत एका ठिकाणीं व्याख्यानास जावयाचें होतें. तेव्हां स्टेशनवर आपलें खूप मोठें स्वागत होईल या भीतीनें अलीकडच्या स्टेशनवर उतरून तेथून एकटेच चालत ते सभास्थानीं जाऊन बसले.










ज्यू लोकांच्या स्वतंत्र राष्ट्राच्या चळवळीबद्दल त्यांना फारच सहानुभूति वाटत असे. ते आस्तिक्यबुद्धीचे शास्त्रज्ञ होते. जगांतील झगडे थांबून सर्वत्र शांतता असावी अशी त्यांची भूमिका होती. महात्मा गांधीं-बद्दल त्यांना फार आदर वाटत होता. अशा महान् शास्त्रज्ञाच्या कार्याचें जर आपणास योग्य मूल्यमापन करावयाचें असेल तर त्यांनीं पुढें मांडलेल्या सापेक्षता-वादाचेंहि थोडें आकलन झालें पाहिजे.

पुढें 'संकुचित सापेक्षतावादा'चीं कांहीं उदाहरणें देऊन विवेचन केलें आहे व त्याचे कांहीं परिणामहि दाखविले आहेत. तसेंच संकलित ( General ) सिद्धांताचेंहि ओझरतें दिग्दर्शन केलें आहे. त्यावरून आइन्स्टाईन यांनीं मनुष्याच्या सृष्टिविषयक कल्पनेमध्यें केवढा फरक घडवून आणला आहे हें दिसून येईल.

## जुन्या स्वयंभू गतीच्या कल्पनेला धक्का

आतां आपण 'सापेक्षतावाद' म्हणजे काय तें पाहूं: सापेक्षतेची कल्पना अगदींच नवीन नाहीं. स्थिति-सापेक्षता पूर्वीपासूनच माहित आहे. एखाद्या वस्तूचें स्थान सांगावयाचें झाल्यास दुसऱ्या एखाद्या वस्तू-पासून तिचें ठराविक दिशेमध्यें असलेलें अंतर सांगावें लागतें. म्हणजे एका वस्तूची स्थिति दुसऱ्या वस्तूच्या अपेक्षेनें मोजली जाते. पृष्ठभागावरील कोणत्याहि बिंदूचें ठिकाण एका मूळ बिंदूतून परस्पराशीं काटकोनांत अस-णाऱ्या दोन रेषांपासून अंतरें देऊन सांगतां येतें. येथें काटकोनांत असणाऱ्या रेषांस 'अक्ष' म्हणतात. नकाशां-त दिलेल्या अक्षांश व रेखांश रेषा या प्रकारच्याच आहेत. यांच्या दिशा निराळ्या घेतल्या तर त्यांपासून येणारीं त्या बिंदूचीं अंतरें निरनिराळीं होतील. पण जर दोन बिंदू घेतले तर त्यांमधील अंतर हें मात्र कोणची-हि अक्षपद्धति घेतली तरी सारखेंच येईल. अव-काशामध्यें दोन अक्षांऐवजीं तीन अक्ष व तीन अंतरें देऊन बिंदूचें ठिकाण दाखवितां येतें. कारण तेथें लांबी, रुंदी, उंची अशीं तीन परिमाणें दाखवावीं लागतात. ही पद्धत डेकार्टनें शोधून काढली. आतां, एखादा बिंदु जर स्थलांतर करूं लागला तर ठराविक स्थलांतर होण्यास त्यास कांहीं काळ लागतो. स्थळ व काळ यांच्या अंतरांच्या गुणकास वेग म्हणतात. आतां कोण-तीहि अक्षपद्धति घेतली तरी दिलेल्या दोन बिंदूं-मधील स्थलांतर तेंच येतें. तसेंच कालांतराचें आहे. कारण दोन विशिष्ट घटनांमधील काळाचें अंतर कोणीहि मोजलें तरी तेंच येणार. तेव्हां पदार्थाचा वेग आपणांस समजतो. पण ज्यावेळीं आपण एखादा पदार्थ, उ० आगगाडी चालली आहे व तिला विशिष्ट वेग आहे असें म्हणतों, तेव्हां स्थिर अशा स्टेशन, झाडें वगैरेंच्या अपेक्षेनें तो वेग आपणांस समजतो. पण गाडीची पृथ्वीच्या अपेक्षेनें गति न घेतां तिची स्वयंभू गति काय आहे हें जाणण्याचा जर आपण प्रयत्न केला तर काय होईल? पृथ्वी सूर्याभोंवती फिरते, सूर्य आपली सर्व सूर्यमाला बरोबर घेऊन आकाशगंगेच्या मध्यकेंद्राभोंवती मोठ्या वेगानें धांवतो. तेव्हां गाडीची निरपेक्ष स्वयंभू गति ही या सर्व गतींच्या संकलित संख्येबरोबर होईल. पण या ठिकाणीं आकाशगंगेचा मध्यबिंदु स्थिर आहे अशी कल्पना गृहीत आहे. पण हें तरी बरोबर कशावरून? तेव्हां पदार्थाची स्वयंभू गति – खरी गति आपणांस आकलन करतां यावयाची नाहीं. दृश्यमान सर्व गति कोणत्या तरी स्थिर धरलेल्या पदार्थाच्या अपेक्षेनेंच घेतलेली असते. निरपेक्ष–खऱ्या गतीची कल्पना यावया-ची असेल तर विश्वव्यापी असा कांहीं तरी स्थिर पदार्थ आहे अशी कल्पना केली पाहिजे. आइन्स्टाइन-च्या पूर्वकाळीं असा विश्वव्यापी पदार्थ ईथर ( आकाश ) ( संवह ) या नांवांनीं ओळखला जाई.

प्रकाश हा लहरीरूपानें उगमापासून सर्व दिशेनें जात असतो अशी कल्पना आहे. लहरी जाण्यास माध्यमाची जरूरी आहे. प्रकाश विश्वांत कोठेंहि जात असल्यामुळें हें माध्यमहि विश्वव्यापी स्थिर माध्यम पाहिजे. यासच ईथर ( आकाश किंवा संवह ) हें नांव दिलें आहे. पण असा स्थिर पदार्थ सर्व विश्वांत भरून असेल तर त्याच्या अपेक्षेनें मोजलेली गति हीच स्वयंभू गति आहे असें म्हणावें लागेल. अशी गति जर असेल तर ती प्रयोगाच्या साहाय्यानें मोजतां आली पाहिजे. यासंबंधीं शास्त्रज्ञांनीं अनेकवेळां अनेक प्रयोग केले. पण सर्वांचा निष्कर्ष असा निघाला कीं, पदार्थाची ईथरमधील स्वयंभू गति केव्हांहि मोजतां येत नाहीं. तसेंच ईथरमधील पदार्थाच्या गतीचा त्या पदार्थांतून निघणाऱ्या किंवा त्याकडे येणाऱ्या प्रकाशाच्या गतीवर कांहींहि परिणाम होत नाहीं असेंहि दिसून आलें. किंबहुना, एखाद्या पृष्ठभागाची गति जर स्थिर











( न बदलणारी ) असेल तर त्या पृष्ठभागावरील द्रष्टयास त्याबाहेरील इतर पदार्थ पाहिल्याखेरीज त्या गतीची जाणीव देखील होणें कठीण आहे असें दिसून आलें. जर अशी स्वयंभू गति मोजणें अशक्य असेल तर ती आहे असें म्हणणें तरी कितपत बरोबर होईल ? आइन्स्टाइन यांनीं हीच विचारसरणी अधिक जोरानें पुढें मांडली. त्यांनीं असें दाखविलें कीं पदार्थाच्या निरपेक्ष गतीची केव्हांहि मोजणी करतां येणार नाहीं, व जी गति आपण मोजूं शकतों ती कोणत्या तरी दुसऱ्या पदार्थाच्या अपेक्षेनेंच मोजलेली असते. अर्थात् पहिल्या संकुचित ( Specific ) सिद्धांतांत फक्त स्थिर गतीच सापेक्ष असते असें त्यांनीं दाखविलें. चलित ( बदलणाऱ्या ) गतीचा त्यामध्यें विचार केला नव्हता. पण या स्थिरगति-सापेक्षतेनुसार जीं कांहीं अनुमानें गणितशास्त्राच्या आधारें त्यांनीं काढलीं तीं जुन्या कल्पनेला धक्का देणारीं होतीं.

## स्थल-काल हे द्रष्टृसापेक्ष

गतिमान् पदार्थाची लांबी गतीच्या दिशेंत बदलते. व गतिमान् पदार्थावर योजलेलें कालांतरहि दुसऱ्या पदार्थावरून योजलेल्या कालांतराहून भिन्न असतें. आपण अशी कल्पना करूं कीं एक आगगाडी एका स्टेशनसमोरून जोरानें पण स्थिर गतीनें धांवत आहे. गाडींतील मनुष्यास स्टेशन, जवळचीं झाडें, तारांचे खांब वगैरे उलट दिशेनें जोरानें पळत आहेत असें वाटेल. गाडीच्या मध्यभागीं एक मनुष्य बसून प्रयोग करीत आहे असें आपण समजूं. त्यानें एक क्षणभर एक दिवा लावला तर प्रकाश हा सर्व बाजूंनीं सारख्याच गतीनें जात असल्यामुळें आणि ड्रायव्हर व गार्ड हे दोघेहि त्या माणसापासून उलट दिशेस सारख्या अंतरावर असल्यामुळें, त्याच्या मतानें ड्रायव्हर व गार्ड या दोघांनाहि प्रकाश एकाच वेळीं दिसेल. म्हणजे दोघांना प्रकाश दिसणें या घटनांमधील काळाचें अंतर शून्य आहे. आतां स्टेशनवरील इसमास यासंबंधीं काय वाटतें तें पाहूं. त्याच्या दृष्टीनें गाडी धांवत आहे. ड्रायव्हर एंजिनच्या बाजूस असून गार्ड पाठीमागें आहे. त्या अर्थी प्रकाश प्रथम ज्या ठिकाणीं उत्पन्न झाला त्या ठिकाणापासून ड्रायव्हर दूर जात आहे व गार्ड त्या ठिकाणाकडे जात आहे. गार्ड हा प्रकाशाच्या उगमाकडे जात असल्यामुळें त्याला प्रकाश लवकर दिसेल व ड्रायव्हर दूर जात असल्यामुळें त्याला उशीरानें दिसेल. म्हणजे स्टेशनवरील इसमास गार्डाला आधीं व ड्रायव्हरला नंतर प्रकाश दिसला असें वाटेल. म्हणजे त्या दोन घटनांमधील कालांतर शून्य नाहीं असें वाटेल. म्हणजे एका व्यक्तीच्या दृष्टीनें दोन घटनांमध्यें जेवढा काळ जातो तितका दुसऱ्या व्यक्तीच्या दृष्टीनें जात नाहीं. कालांतर ही कल्पना द्रष्ट्याच्या परिस्थितीवर अवलंबून आहे असें सिद्ध होतें. तसेंच स्थलांतराचेंहि होतें. वरील उदाहरणांतच आपण अशी कल्पना करूं कीं ड्रायव्हर व गार्ड यांना ज्या वेळीं प्रकाश दिसला त्याच वेळीं त्यांनीं आपल्या समोरील प्लॅटफार्मवर चुना किंवा रंग टाकून कांहीं खुणा केल्या. आतां गाडीमधील मनुष्याच्या दृष्टीनें ड्रायव्हर व गार्ड या दोघांना प्रकाश एकाच वेळीं दिसला, त्या अर्थी त्यांनीं खुणाहि पण एकाच वेळीं केल्या. तेव्हां त्या दोन खुणांमधील अंतर हें ड्रायव्हर व गार्ड यांचेमधील अंतराबरोबर आहे असें त्या मनुष्यास वाटेल. आतां स्टेशनवरील इसमाच्या दृष्टीनें गार्डनें प्रकाश आधी पाहिल्यामुळें आधीं खूण केली. ड्रायव्हरनें प्रकाश मागाहून पाहिला व त्यामुळें मागाहून खूण केली. मध्यंतरीं गाडी थोडी पुढें चालली. त्या अर्थी त्या दोन खुणांमधील अंतर ड्रायव्हर व गार्ड यांच्यामधील अंतरापेक्षां जास्त आहे असें त्यास वाटेल. म्हणजे कालांतराप्रमाणेंच दोन स्थलांमधील अंतरहि द्रष्ट्याच्या परिस्थितीवर अवलंबून आहे. स्थळ व काल यांचीं मापें द्रष्ट्याच्या परिस्थितीवर अवलंबून असतात ही गोष्ट सापेक्षतावादानें दाखविली. जुन्या वास्तवशास्त्रांत दोन घटनांमधील स्थळ व काळ यांचीं अंतरें द्रष्टयावर अवलंबून नव्हतीं. अर्थात् स्थळ व काल यांना एक विशिष्ट स्वयंभू किंमत होती ती नव्या वास्तवानें नाहींशी केली. तेव्हां आइन्स्टाईन यांच्या मतें स्थळ व काल या अगदीं भिन्न दोन स्वतंत्र वस्तू न मानतां एकाच स्थलकालात्मक अवकाशाचीं दोन स्वरूपें आहेत असें मानलें पाहिजे. सापेक्षतावादानें स्थल-कालाचें ऐक्य दर्शविलें. तसेंच त्यानें वस्तू व शक्ति यांचेंहि ऐक्य दाखविलें आहे.

## वस्तूचें शक्तींत रूपांतर

पदार्थाचें वस्तुमान व ज्याला आपण व्यावहारिक भाषेंत वजन म्हणतों तें गतीमुळें वाढतें व ही वाढ








गतीमुळें उत्पन्न होणाऱ्या शक्तीच्या प्रमाणांत असते हें आइन्स्टाइन यांनीं गणिताच्या आधारें दाखविलें. हा फार महत्त्वाचा सिद्धान्त आहे. कारण या ठिकाणीं गतिशक्तीचें वस्तुमानांत रूपांतर होऊन तें वाढतें. किंबहुना, वस्तुमान व शक्ति हीं मूलतः भिन्न नसून एकाच गोष्टीचीं दोन रूपें आहेत असें त्यांनीं सिद्ध केलें. येथें हा प्रश्न उत्पन्न होतो कीं एखादा लोखंडाचा पदार्थ खूप तापविला म्हणजे त्यामध्यें पुष्कळ उष्णतारूप शक्ति निर्माण केली तर त्याचें वजन वाढतें काय ? जुन्या शास्त्रज्ञांना हें मान्य नव्हतें. कारण त्या वेळच्या प्रयोगांनीं तें सिद्ध झालें नव्हतें. पण अत्यंत वेगानें जाणाऱ्या विद्युत्कणांचें वजन वाढतें ही गोष्ट अलीकडील अतिसूक्ष्म प्रयोगांनीं सिद्ध झाली आहे. सरसकट पदार्थांच्या वजनामध्यें त्यावरील शक्तीमुळें वाढ झालेली दिसत नाहीं. याचें कारण ती वाढ अत्यंत अल्प असते म्हणून मोजता येत नाहीं. पण शक्तीमध्यें अतिशय वाढ झाल्यास ती वस्तुमानांतील वाढ मोजण्याइतपत होते. वरीलप्रमाणें शक्ति व वस्तुमान एकरूपच असतील तर आपणांस वस्तूचें शक्तीमध्यें व उलट शक्तीचें वस्तूमध्यें रूपांतर करितां आलें पाहिजे व वस्तूचें शक्तींत रूपांतर करून त्याचा व्यवहारांत उपयोग करितां आला पाहिजे. ही गोष्ट आतां साध्य झाली. हल्लीं आपण अणुशक्ति, अणुबांब वगैरेसंबंधीं वाचतों. या ठिकाणीं यूरेनिअमचे अणूपासून जी शक्ति आपणांस मिळते ती वास्तविक युरेनिअमच्या अणूंतील कांहीं वस्तुतत्त्वांचें शक्तींत रूपांतर झाल्यामुळेंच आपणांस मिळतें. यूरेनिअम बॉंबमध्यें ही क्रिया युरेनिअम अणूचें विघटन होत असतां होत असते. याच्या उलट हैड्रोजन बॉंबमध्यें चार हैड्रोजन अणूंचें एका हेलिअम अणूमध्यें रूपांतर होत असतां कांहीं वस्तुतत्त्वाचें शक्तींत रूपांतर होतें व आपणांस प्रचंड शक्ति मिळते. अर्थात् या तऱ्हेच्या प्रयोगांची शक्यता आइन्स्टाइन यांच्या वस्तुशक्तीच्या एकरूपतेच्या सिद्धांतामुळेंच शास्त्रज्ञांना वाटूं लागली, तेव्हां आइन्स्टाइन यांना एका दृष्टीनें अणुशक्तीचे व अणुबांबचे मूळ उत्पादकच म्हटलें पाहिजे.

### संकलित सापेक्षतावाद

पदार्थांची स्थिर गति त्या पदार्थावर असलेल्या गृहस्थानें केलेल्या कोणत्याहि प्रयोगानें सिद्ध होण्यासारखी नाहीं म्हणून आइन्स्टाइन यांनीं तिचें अस्तित्व नाकारलें व स्थिर गति सापेक्षच आहे असें दाखविलें. पण चलित गति म्हणजे तरी काय ? तिचें अस्तित्व आपणांस समजतें का तें पाहूं : एक मोठा पृष्ठभाग एका मध्यबिंदूभोंवतीं जोरानें फिरत आहे अशी कल्पना करूं व याचा परिणाम त्या पृष्ठभागावरील मनुष्यास कसा दिसेल व त्याबाहेरील मनुष्यास कसा दिसेल हें पाहूं. ज्याप्रमाणें आपणांस पृथ्वीची गति भासत नाहीं त्याप्रमाणेंच त्या पृष्ठभागावरील माणसास गति भासणार नाहीं. उलट, बाहेरील पदार्थ आपल्या भोंवतीं फिरतात असें वाटेल. पण चक्राकार गति असलेल्या पृष्ठभागावरील पदार्थ जोरानें दूर फेकले जातात. तेव्हां तो मनुष्य अशी कल्पना करील कीं येथें एक प्रेरक क्षेत्र आहे. ज्याप्रमाणें गुरुत्वाकर्षणानें पदार्थ केंद्राकडे ओढले जातात तसें येथें उत्सारक क्षेत्रामुळें पदार्थ दूर फेंकले जात आहेत. येथें चक्राकार गतीचे परिणाम उत्सारक क्षेत्रासारखे आहेत असें दिसेल. आतां एखादा पृष्ठभाग जर चलित गतीनें वर जात असेल तर त्यावरील मनुष्यास गुरुत्वाकर्षणक्षेत्रासारखे परिणाम दिसतील—म्हणजे उत्सारक किंवा आकर्षक प्रेरक क्षेत्र व चलित गति यांच्या परिणामांत साम्य आहे असें दिसून येईल. तेव्हां गतीनें होणारे परिणाम म्हणजे स्थलांतर व कालांतर यांमध्यें घडणारा फरक हे आकर्षक क्षेत्रामध्येंहि दिसून येतील. उदाहरणार्थ, पृथ्वीवर एखाद्या अणूच्या आंदोलनास जो काळ लागेल त्यापेक्षां सूर्यावर तेथील आकर्षक क्षेत्र अधिक मोठें असल्यामुळें अधिक काल लागेल. ही गोष्टहि प्रयोगानें सिद्ध झाली आहे. तसेंच आकर्षणक्षेत्रासारखे परिणाम अवकाशाच्या वक्रतेमुळेंहि होतात असें आइन्स्टाइन यांनीं दाखविलें आहे. बुधाच्या कक्षावर्तनांतील चूक—जी न्यूटनच्या गणितानें उलगडून दाखवितां येत नव्हती—ती नव्या गणितानें नीट सोपपत्तिक रीतीनें उलगडून दाखवितां येते. तसेंच त्यांच्या सिद्धांताप्रमाणें गुरुत्वाकर्षण व विद्युच्चुंबकाचें क्षेत्र यांचीहि योग्य तऱ्हेनें सांगड घालून दाखवितां येते. आइन्स्टाइन यांच्या संकलित (General) सापेक्षतावादाप्रमाणें प्रकाशाचें आकर्षणक्षेत्रामुळें होणारें वक्रीभवनहि प्रयोगानें सिद्ध झालेलें आहे. संकलित सापेक्षतावाद व

अणुवास्तवांतील शक्तिकणवाद यांचीहि सांगड घालण्याचा त्यांचा प्रयत्न चालू होता.

सापेक्षतेच्या सिद्धांतामुळें जर कोणती महत्त्वाची गोष्ट सिद्ध झाली असेल तर ती ही कीं मनुष्याचें वास्तवसृष्टीचें ज्ञान द्रष्टृसापेक्ष आहे ही होय. कारण आपलें ज्ञान स्थळ-व-कालयुक्त असतें व स्थल व काल ही विभागणी द्रष्ट्याच्या परिस्थितीवर (सापेक्ष गतीवर) अवलंबून असते हें वर दाखविलें आहे. अर्थात् जड सृष्टीच्या ज्ञानाविषयीं ही स्थिति तर जड सृष्टीच्या पलीकडे असलेल्या जीवसृष्टीविषयीं किंवा मानसिक सृष्टीविषयीं बोलावयासच नको !

## नव्या शास्त्रीय युगाचे प्रवर्तक

न्यूटन व आइन्स्टाइन यांच्या युगांचा मुख्य फरक म्हणजे हा कीं न्यूटनयुगांत न्यूटनचे तीन गतिसिद्धांत व गुरुत्वाकर्षणाचा नियम यांच्या साहाय्यानें ग्रहांच्या बिनचूक गति मनुष्यास समजूं लागल्या. प्रकाश व विद्युत् यांतील महान् शोधामुळें माहीत नसलेलीं दालनें खुलीं झालीं. त्यामुळें मनुष्यास शास्त्रीय सिद्धांताच्या आधारें सृष्टीचें पूर्ण सोपपत्तिक ज्ञान सहज लवकर होईल असें वाटूं लागलें व जड सृष्टींतील नियम इतर सृष्टीसहि लावतां येतील, असें वाटूं लागलें. पण आइन्स्टाइन यांच्या सापेक्षतावादानें जुन्या नियमांत सुधारणा करून ते अधिक कार्यक्षम केले तरीदेखील मानवी बुद्धीच्या आकलनशक्तीच्या मर्यादा त्यानें दाखवून दिल्या; व मानवास होणारें ज्ञान द्रष्ट्यावर अवलंबून असून कदाचित् सत्यसृष्टिहि आपणांस दृग्गोचर होणाऱ्या स्वरूपापेक्षां भिन्न असूं शकेल अशी जाणीव करून दिली. अणुवास्तवांत उपयोगी पडणारा शक्तिकणवाद व वस्तुलहरीवाद यांनीं तर त्यावरहि कडी केली आहे. अणुगर्भाच्या बाहेरील रचनेसंबंधीं बसविलेले सिद्धांत अणुगर्भाच्या रचनेचा विचार करतांना तोकडे पडतात. तेथें नव्या तऱ्हेनेंच उपपत्ति लावावी लागते. म्हणजे वास्तवशास्त्रांतील सर्व घटनांची संगति कोणत्याहि एका विशिष्ट उपपत्तीनें आज तरी लावतां येत नाहीं. एक वेळीं वास्तवशास्त्रांतील सिद्धांत व नियम अंतिम स्वरूपाचे वाटत असत. पण आइन्स्टाइन यांच्या उपपत्तीनंतर प्रचलित सिद्धांत हे तात्पुरत्या स्वरूपाचे असून नव्या शोधाप्रमाणें नवीन सिद्धांत मानावे लागतात. व त्यांचें अंतिम सत्य स्वरूप काय आहे याचें कधींकाळीं तरी पूर्ण आकलन होईल कीं नाहीं हें निश्चितपणें सांगणें कठिण आहे. म्हणजे एका बाजूनें ज्ञात विश्वाचें क्षितिज वाढत चाललें आहे, सृष्टींतील अनेक शक्तींवर मनुष्याचा ताबा बसत चाललेला आहे, तर दुसऱ्या बाजूनें आपणांस अज्ञात असा फारच मोठा भाग असला पाहिजे ही जाणीवहि उत्पन्न होऊं लागली आहे. आपल्याला सर्व समजतें या भूमिकेपेक्षां आपल्याला अजून पुष्कळच शिकावयाचें आहे, ही भूमिका मानवाच्या उन्नतीच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर आहे. ही वृत्ति निर्माण होण्यास अनेक शास्त्रज्ञांचे श्रम खर्ची पडले आहेत हें खरें. पण या फरकाचें मूलतः श्रेय आइन्स्टाइन यांच्या नवीन सिद्धांतालाच दिलें पाहिजे. या दृष्टीनें आइन्स्टाइन हे नव्या शास्त्रीय युगाचे प्रवर्तक आहेत असें म्हटलें तर त्यांत बिलकूल अतिशयोक्ति नाहीं.

---

## भंगलेला आदर्श !

नील नभाची कीं चकती<br>
शांत सराची निर्मल ती<br>
असा आरसा आणियला<br>
आत्मदर्शना ठेवियला<br>
अधःपात मीं परि केला<br>
खळ्कन भूमीवर पडला<br>
भंगुनि गेला तो अयना<br>
दिसे एकता नच नयनां<br>
बघतां रूपाचा झोंक<br>
अनेक दिसतीं जरि एक<br>
हर्ष मनींचा मावळला<br>
बोध मना परि आकळला<br>
" सर्व मनांची हो मिळणी<br>
एक विचारें हो भरणी "<br>
पूर्व ऋषींचा आदेश<br>
सोडुनि गेला हा देश

प्रेम-रसायन या अयना<br>
पुन्हां एकता आणिल ना !

— विश्वनाथ के. महाबळेश्वरकर







## अशा त्या एका क्षणीं —!

१

थिजलेली होती धरती गाढ अंधारांत
निजलेलीं पिलें पक्षिणीच्या पंखकुशींत
अशा एका त्या क्षणीं......
बुडबुडला घट तान्हेला
आंधळा शर सणसणला
शब्दवेधी पराक्रमी भूपालाचा
आटला प्राण पिलाचा–श्रावणाचा
कोंवळें ऊन रक्त
धरतीला भिजवी
जागवी, थरारवी

२

मातींतून उठे गंधदर्प रक्तपिसा
दुर्बलता नि असूया यांचीं
धुरकट निळसर शाप–कबंधें
गगनीं उठलीं
छाया भिनली
त्यांची गरळासम अंत:पुरांत राजाच्या
गिळिलें त्या छायांनीं
सुखस्वप्न रामसीतेचें
दशरथ-कौसल्यामातेचें
अयोध्या-राजनगरीचें
तो आंधळा शर, तो अंधार–क्षण
वेधी धरतीमातेचें हृदय करुण

३

तगमग धरतीच्या हृदयाची
हेलावलें तिचें मन गूढ......
मोहाचीं भीतीचीं दशमुखें
क्रौर्याचे धैर्याचे सहस्रबाहू
पसरून उभा दुर्बल मानव
अशान्त चकित दिङ्मूढ...
पसरती छाया, उफाळती ज्वाळा
ज्यांत जळे सोन्याची रावण-लंका
राखोडींत, रक्ताच्या विखारांत, उमलें
विजयाचें कमलपुष्प...
पुष्पकीं नेई अग्निशुद्ध सीतेला
विश्वविजयी रामराजा अयोध्येला
अयोध्येवर पण अजून
कबंधछायांचें नर्तन

४

दवरूप घेई मानव
आणि निर्मी दानवरूप
झुंजतीं दोन्हीं रूपें
होण्यास एकरूप रक्तांत

जें रक्त ठिबकें धरती-हृदयीं
श्रावणबाळांचें, शंबूकांचें, एकलव्यांचें
जे अश्रू सीताद्रौपदींचे, रामभरतांचे

कसें निवावें तें तप्त हृदय ?
कसें शांत व्हावें मानवी पाप ?
कोठें विसांवावें त्या क्षणानें ?
आणि आंधळ्या त्या बाणानें ?

बाण वेधी विनहाडाची पुरुषी जीभ
रजकाची–म्हणे, भ्रष्टली जानकीराणी
झालें रामराजाचें थोर मन पाणीपाणी

५

धीरोदात्त मानवहृदय चढूं पाहे
काळ्या दरडीवर
जिची उतरण पोहोंचे पाताळीं
कोठेंतरी ! जेथून उठें गंभीर स्वर
धरतीमातेचा :
"आगीनें शुद्ध होवो निर्जीव सोनें
पण सीता तर राणी मानव-स्त्री
घेतें तिला मी माझ्या उदरीं
मातीस मिळेल माती सोन्याची

तेव्हांच होईल शांत तो क्षण !
ती बुडबुड तान्हेल्या घटाची !
तो आर्त अंतशब्द श्रावणाचा !
तगमग माझ्याहि हृदयाची !"

६

असें संपें तें एक रामायण
एक, अनेकांतील एक, कथा
जी घडली अन् घडतेहि नित्यनवी
पुन्हां, पुन्हां आणि पुन्हां
ओघळती काळाचे अंधाराचे क्षण
उभी तीच काळी दरड विक्राळ
युगांची ! घसरण जिची पाताळीं

मानव चढतो पडतांना खोल
उठती धरतीचे गंभीर बोल
सदय अदय ..................

पुन्हां बुडबुडती तान्हेले घट
सणाणती रक्तपिपासू तीक्ष्ण शर
गारगोटीच्या वा अणुगोलांच्या अग्रांचे
शोधित
वेधित
हृदयें श्रावणबाळांचीं !

— दि. के. बेडेकर



अनुक्रमणिका








प्रा. प. वि. पटवर्धन

# करचौकशी-मंडळाच्या शिफारसी

भारतीय करव्यवस्थेवर स्वातंत्र्यपूर्वकालांत टीकेची झोड उठत असे. ती प्रस्थापित अर्थव्यवस्था टिकविणारी, प्रतिगामी, विषमता वाढविणारी, विस्कळित, क्लिष्ट, जुनाट अतएव टाकाऊ आहे – असे अनेक आरोप तिच्याविरुद्ध करण्यांत येत असत. केन्द्र व प्रान्त-सरकारें यांच्या धोरणांत बेबनाव, हिशेबांतील गैरव्यवस्था व अनावश्यक पुनरुक्ति आणि वसुलीमधील ढिलाई हे दोषहि दाखविले जात. म्हणून स्वातंत्र्योत्तर कालांत ज्या अर्थव्यवस्थेबाबत सुधारणा होणें आवश्यक होतें त्यांत करव्यवस्थेच्या चौकशीला आणि पुनर्घटनेला प्राधान्य होतें.

शिवाय मागील करचौकशी होऊन २५ वर्षे होऊन गेलीं होतीं. आणि या अवधींत भारताचें राजकीय व आर्थिक स्वरूप पालटून गेलें होतें. त्यामुळें राष्ट्रीय केंद्रसत्तेचीं कर्तव्यें व करपद्धतीचीं उद्दिष्टें यांतहि आमूलाग्र बदल झाला होता. परकीय सत्तेनें कर म्हणजे सरकारी तिजोरी भरण्याचें साधन एवढाच तिचा उपयोग केला होता. आतां भारतानें समाजवादी अर्थव्यवस्थेच्या दिशेनें पाऊल टाकण्याचें ठरविल्यानंतर करव्यवस्थेचा इतका मर्यादित उपयोग होणें अशक्य होतें. आतां करव्यवस्थेला संपत्तीच्या व उत्पन्नाच्या समान वांटणीचें एक प्रभावी साधन म्हणून राबवावयाचें होतें. भारताची भौगोलिक परिस्थिति पार पालटून गेली होती. पाकिस्तान-निर्मितीनें भारतांतील बराच मोठा प्रदेश गेला होता. पण एतद्देशीय संस्थानें विलीन वा भारतीय संघराज्यांत इतर राज्यांसमवेत समान भूमिकेवर सामील झाल्यानें भारतीय राज्यव्यवस्थेला अधिक एकसंधीपणा आला होता. म्हणून करव्यवस्था एकराष्ट्रीयत्वाच्या भूमिकेवर आणणें शक्य व आवश्यक झालें होतें. राष्ट्रीय सरकार अस्तित्वांत आल्यानें आन्तरराष्ट्रीय आर्थिक व्यवहारांतील भारतीय भूमिका अधिक राष्ट्रनिष्ठतेची झाली होती व त्यामुळें आयात-निर्यात-करांवर परिणाम होणें अपरिहार्य होतें. युद्धजन्य परिस्थितीमुळें समाजांतील निरनिराळ्या थरांत प्राप्तिविषयक बदल झाले होते. करपात्रतेचें क्षेत्रहि बदललें होतें. या सर्व गोष्टींमुळें करव्यवस्थेची कालानुरूप पुनर्घटना करणें आवश्यक होतें.

म्हणून भारतसरकारनें एप्रिल १९५३ मध्यें सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ व एक माजी अर्थमंत्री डॉ. जॉन मथाई यांच्या अध्यक्षत्वाखालीं एक करव्यवस्था-चौकशी-मंडळ नेमलें. मंडळापुढें साधारणतः पुढील प्रश्न होते : सरकारी उत्पन्नाचें व खर्चाचें स्वरूप, करांचा बोजा, राष्ट्रीय विकासाच्या दृष्टीनें, साधनसामग्री निर्माण करण्याच्या दृष्टीनें करव्यवस्थेचा उपयोग, समाजांतील आर्थिक विषमता कमी करण्यास करांचा उपयोग, करव्यवस्था व भांडवलनिर्मिति व गुंतवण यांचा संबंध इत्यादि. या सर्व प्रश्नांची बारकाईनें चौकशी करून मंडळानें प्रथम सद्यःस्थितीवरील आपला अभिप्राय व्यक्त केला आहे व याबाबत मूलग्राही स्वरूपाच्या शिफारशी केल्या आहेत. श्री. चिंतामणराव देशमुख यांनीं लोकसभेंत सांगितल्याप्रमाणें त्यांचा अहवाल म्हणजे एक ऐतिहासिक महत्त्वाचा प्रचंड ग्रंथ आहे. या अहवालाचे तीन खंड आहेत. पहिल्या खंडांत करव्यवस्थेचा साकल्यानें विचार केला असून, दुसऱ्या व तिसऱ्या खंडांत अनुक्रमें केंद्र-सरकारचे कर व राज्य-सरकारांचे कर यांचा ऊहापोह केला आहे. हा रिपोर्ट साद्यंत स्वरूपांत लोकसभेंत २८ फेब्रुवारी रोजीं प्रसिद्ध करण्यांत आला. त्याचा जो सारांश मार्च १९५५ च्या रिझर्व्ह बँकेच्या नियतकालिकांत प्रसिद्ध झाला आहे त्याच्यावर प्रस्तुत लेख आधारलेला आहे.

## प्रचलित करव्यवस्थेचें स्थूलदर्शन

गेल्या महायुद्धानंतर भारताची करप्राप्ति वाढलेली दिसते ती मुख्यतः चलनवाढीनें निर्माण झालेल्या किमतींच्या फुगवट्यामुळें आहे. राष्ट्रीय वट्ट उत्पन्नाशीं जर करांच्या मिळकतीची तुलना केली तर उत्पन्नांत फारच अल्प वाढ झालेली दिसेल. सरकारी पैशाचा व्यय जास्तींत जास्त किफायतशीर रीतीनें व्हावा म्हणून खर्चावर सतत देखरेख व नियंत्रण पाहिजे. तें काम एका बलिष्ठ अधिकार असलेल्या समितीकडे सोपवावें असें समितीचें म्हणणें आहे. एकंदरीनें सरकारी खर्च उत्पादक बाबींकडे अधिक वळला आहे. पंचवार्षिक योजनेमुळें भांडवली खर्चाला नवें महत्त्व प्राप्त झालें आहे. मात्र आर्थिक








विषमता कमी होण्यास अशा खर्चाचा फारसा उपयोग झाला नाहीं. कारण राष्ट्रीय उत्पन्नाच्या मानानें वद्ट खर्च फारच कमी प्रमाणांत आहे. आणि कमी उत्पन्न-वाल्या गटांना प्रत्यक्ष किंवा हितकारी योजनेमार्फत जी मदत मिळते ती अत्यल्प प्रमाणांत आहे. सरकारी खर्चाच्या कल्याणकारी धोरणामुळें कराबद्दलची अप्रीति कमी झाली असून करपात्रताहि थोडीफार वाढली आहे.

करांमध्यें प्रत्यक्षापेक्षां अप्रत्यक्षांचाच अधिक भरणा आहे. त्यांचें प्रमाण वद्ट उत्पन्नाच्या शें. ४५ टक्के आहे. विक्रीकर हा एक नवा प्रभावी अप्रत्यक्ष कर राज्य-सरकारांना मिळाला आहे.

ग्रामीण भागांत रहाणाऱ्या लोकांपेक्षां नागरी भागांत रहाणाऱ्या लोकांवर करांचा बोजा अधिक पडतो. मात्र दोन्हीं विभागांतील मध्यम आणि निम्न-मध्यम (lower middle) उत्पन्नवाल्या लोकांत हा भेद कमी सांपडतो. ग्रामीण भागापेक्षां नागरी भागांतील कर अधिक पुरोगामी स्वरूपाचे आहेत. शेतसारा डोईजड नाहीं. उत्पन्नाचा ओघ नागरी भागाकडून ग्रामीण भागाकडे अथवा उलट्या दिशेनें वाहतो आहे असें निश्चित अनुमान काढतां येणार नाहीं. मात्र निरनिराळया उत्पन्न-समूहांत असे ओघ बदललेले आढळतील. एकंदरीनें ग्रामीण लोकांपेक्षां नागरी-लोकांवरील करांचें ओझें वाढलेलें दिसेल.

संयुक्त-भांडवल-जबाबदारीच्या व इतर कंपन्यांच्या व्यवहाराची कसून चौकशी करतां असें आढळून आलें कीं मुख्यतः भाग-भांडवल व धंद्यांत गुंतवलेल्या नफ्यां-तूनच नवीन भांडवल निर्माण झालेलें आहे. सामु-दायिक बचतच या कामीं अधिक उपयोगी ठरली आहे. वांटण्यांत येणाऱ्या नफ्याची रक्कम कायम ठेवून किंवा वाढती ठेवून, खोट आल्यास नफ्याची धंद्यांतील गुंत-वण कमी करावी याकडे कारखानदारांची प्रवृत्ति होत आहे. धंद्यांतील नफ्याची गुंतवण वद्ट कर किंवा करांचें मान यावर अवलंबून नसून वद्ट नफा व नफ्याचें मान यांच्यावर अवलंबून आहे.

केंद्रीय सरकार अन्तर्गत कर वस्तूंवर बसवितें. त्याचप्रमाणें विक्रीकर हाहि अप्रत्यक्षपणें वस्तूंनाच लागू आहे. अन्तर्गत कर लागू असणाऱ्या वस्तूंची सारखी राज्याराज्यांतून देवाणघेवाण चालू असते. त्यामुळें विक्रीकर व अन्तर्गतकर यांच्या अम्मलबजावणींत राज्यांचा आपापसांत आणि राज्यें व केंद्रसरकार यांचा पदोपदीं संबंध येतो. याकरतां या करांच्या अंमलबजाव-णींत एकाच पद्धतीची योजना असावयास पाहिजे व केंद्रसरकार आणि इतर राज्यसरकारें यांचे अधिकार व परस्परसंबंध निश्चित आणि स्पष्ट होणें आवश्यक आहे.

## मंडळाच्या शिफारशी

वरीलप्रमाणें मंडळानें प्रचलित परिस्थितीचें आक-लन केल्यानंतर, उद्दिष्ट व शक्यता यांचा समन्वय घालून आपल्या सूचना केल्या आहेत. सर्वसाधारणपणें मंडळाच्या शिफारसींचा रोख असा आहे : ( १ ) करांचें ओझें अधिक समप्रमाणांत विभागलें जावें. ( २ ) समाजांतील आर्थिक विषमता नष्ट व्हावी. ( ३ ) उत्पादक उपक्रमांना अधिक पैसा उपलब्ध व्हावा. ( ४ ) करव्यवस्थेंत अधिक सुसूत्रितपणा यावा. ( ५ ) स्थानिक संस्थांना अधिक पैसा मिळावा.

या शिफारशी एकमेकांच्या विरुद्ध नसून एकमेकांना पूरक आहेत. उदा०, आर्थिक विषमता नष्ट करण्यांत यावयाच्या उपायांनीं उत्पादक उपक्रमांना अधिक भांडवल मिळूं शकेल.

मंडळानें करव्यवस्थेबाबत आपला सर्वसाधारण दृष्टिकोन पुढीलप्रमाणें मांडला आहे : " एकंदरीनें पाहतां करव्यवस्था हें विकासयोजनोपयोगी साधनसामग्री मिळविण्याचें साधन असलें पाहिजे. करामुळें सर्वच लोकांच्या, विशेषतः श्रीमंत लोकांच्या व्ययशक्तीवर नियंत्रण बसलें पाहिजे. खाजगी उद्योगधंद्यांतील गुंतवण कमी होतां कामा नये आणि सार्वजनिक उपक्रमासाठीं भरपूर भांडवल उपलब्ध झालें पाहिजे. करव्यवस्थेचें स्वरूप वैविध्यपूर्ण असलें पाहिजे. तिच्यांतील करांचें प्रमाण व तिचा विस्तार अवश्य तेवढा मोठा असावयास पाहिजे. याकरतां चैनीच्या व तत्सम वस्तूंवर कर लादले पाहिजेत. तसेंच जीवनो-पयोगी वस्तूंवरहि माफक प्रमाणांत कर बसवावे लाग-तील. देशांतील करपात्र साधनांचा करव्यवस्थेंत समावेश झाला नसून करवाढीस अद्याप वाव आहे. "

आतां वरील उद्दिष्टानुसार मंडळाच्या शिफारसींचा विचार करूं.

## करांच्या ओझ्याची सम वांटणी

नागरी लोकांवर करांचा बोजा जास्त आहे; पण मंडळाच्या मतें नागरी लोक द्रव्यप्रधान अर्थव्यवस्थेंत राह-

तात; ते अधिक संपन्न असतात; म्हणून ते कर सोसण्यास अधिक समर्थ आहेत. ग्रामीण भागांत करवाढीला फारसा वाव नाहीं. पण भारी शेतीउत्पन्नांवर चढत्या श्रेणींत कर बसवितां येईल. शेतसारा हल्लीं कमी आहे. त्यांत थोडीफार वाढ करतां येईल.

तसेंच प्राप्तीवरील करांची वर्गवारी लावतांना मंडळाला असें आढळून आलें कीं प्राप्तीवरील कराच्या किंवा Super-Tax च्या खालच्या थरांतच कर देणारे अधिक असतात. म्हणून या दोन करांच्या आकारणीसाठीं अधिकाधिक थर निर्माण करण्यानेंच करदानाची जबाबदारी अधिक वाजवी रीतीनें विभागली जाईल.

त्यांनीं अप्रत्यक्ष करांत वाढ सुचविली असल्यानें त्यांच्या मतें प्रत्यक्ष करांचा बोजा वाढविणें प्रशस्त होणार नाहीं. पण दरडोई उत्पन्नाचें प्रमाण लक्षांत घेऊन, करसुटीच्या सवलतीची मर्यादा ३००० रु. पर्यंत उतरविणें त्यांना इष्ट वाटलें.

## आर्थिक विषमतेवर इलाज

मंडळाच्या मतें लोकांच्या उत्पन्नामध्यें अनावश्यक विषमता फार आहे. तिच्या मुळांवरच घाव घालण्यानें ती नाहींशी होईल. त्यासाठीं चढत्या श्रेणीच्या करपद्धतींत वाढ करावयास पाहिजे. जास्तींत जास्त उत्पन्नावर बंधन घालण्यानें श्रीमंतांच्या व्ययशक्तीवर नियंत्रण बसेल व अनावश्यक खर्च वांचून पैसा योग्य कामीं खर्च होईल. याकरितां जास्तींत जास्त उत्पन्नाची मर्यादा हिंदु कुटुम्बाच्या सरासरी वार्षिक उत्पन्नाच्या तीसपट असावी असें सुचविलें आहे. याच हेतूनें त्यांनीं श्रीमंतांच्या करतां एक 'जादा कर व सक्तीची ठेव' या प्रकारची योजना मांडली आहे. त्याअन्वयें २५००० रु. किंवा अधिक उत्पन्नवाल्या लोकांवर चढत्या श्रेणींत जादा कर बसवावयाचा. व त्यांना या करापोटीं सरकारनें कराच्या रकमेइतकें लांब मुदतीचें कर्ज सरकारी रोख्यांत गुंतविण्यासाठीं नाममात्र व्याजानें द्यावयाचें. तसेंच अशा लोकांकडून २० वर्षांच्या मुदतीनें ' ठेव ' वसूल करावयाची. ती २० वर्षांनीं कर्जरोख्यांच्या रूपानें परत करावयाची. हे रोखे आणखी २५ वर्षांनीं वटवितां यावयाचे. या योजनेनें श्रीमंतांची क्रयशक्ति घटेल व सरकारलाहि पैसा मिळेल.

याखेरीज जिंदगीकराची वाढ—व्याप्ति व दर दोन्ही दृष्टींनीं—मंडळानें सुचविली आहे. त्यामुळें विषमता नष्ट होण्यास मदत होईल.

त्याचप्रमाणें चैनीच्या वस्तूंवर अधिक कर, वाढत्या दरानें विक्रीकर, ३०००वरील शेती उत्पन्नावर चढत्या श्रेणींतील कर वगैरे मार्गांनीं आर्थिक विषमता नष्ट करावी असें सुचविलें आहे. नुकसानभरपाई न देतां मालमत्ता घ्यावी असें त्यांनीं कोठेंहि सुचविलें नाहीं.

त्यांनीं लोकांच्या काम करण्याच्या प्रवृत्तीसंबंधानें लिहितांना असें म्हटलें आहे कीं भारी उत्पन्नवाल्या लोकांवर कर लादल्यानें त्यांची कार्यप्रेरणा कमी होते असा जो प्रवाद आहे त्यांत अतिशयोक्तीचा भाग आहे. म्हणूनच त्यांनीं असे कर सुचविले आहेत. मात्र अत्युच्च करांत वाढ होणें त्यांना अशक्य वाटतें. रुपयांतील १३½ आणे कर म्हणजे करवाढीचा परमोच्च बिंदु गांठलेला आहे. आतां त्यांत वाढ करणें हितकारी नाहीं.

## उत्पादक उपक्रमांना अधिक पैसा

राष्ट्रीय नियोजनास व उत्पादक उपक्रमांना अधिक पैसा उपलब्ध करून देणें हें एक करव्यवस्थेचें मोठें साध्य आहे. त्या दृष्टीनें मंडळानें बऱ्याच विधायक सूचना केल्या आहेत. त्यांचे दोन भाग पाडतां येतील: **(अ) अधिक भांडवलनिर्मिति व गुंतवण या बाबतच्या सूचना (ब) करांचें उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टीनें सूचना.**

**(अ) अधिक भांडवलनिर्मिति व गुंतवण** — करांमुळें खाजगी उद्योगधंद्यां-( Private Sector )मध्यें गुंतवण कमी न होतां वट्ट गुंतवण वाढली पाहिजे, यासाठीं राज्यकारभारासारख्या अनुत्पादक गोष्टींवर करांचा पैसा खर्च होतां कामा नये.

मंडळाच्या पाहणींत असें दिसून आलें कीं भांडवलाची निर्मिति, कायम स्वरूपाच्या मालमत्तेंत झालेली वाढ, फेरिस्तांतील वाढ ( Inventory Accumulation ), गुंतवणींतील वाढ, कर्जें यांमुळें झाली आहे. त्याचप्रमाणें उद्योगधंद्यांच्या वाढीसाठीं गुंतवलेला नफा व भागभांडवल यांचाच मुख्यतः उपयोग झाला. तेव्हां या सर्व गोष्टींना पोषक अशी करव्यवस्था मंडळानें सुचविली आहे. त्या अन्वयें घसाऱ्याच्या सवलती, तोटा मोजण्याच्या सवलती, करमाफी वगैरे

सूचना त्यांनीं केल्या आहेत. घसारा काढूं दिल्यानें मालमत्तेच्या पुनःस्थापनेसाठीं अधिक पैसा निर्माण होतो. म्हणून ही सवलत विकासयोजनेच्या सवलती मिळत नसणाऱ्या सर्व उद्योगधंद्यांना लागू करावी. हल्लीं यंत्रसामग्रीवरील घसाऱ्यांत जी २० टक्के सवलत मिळते ती मूळ किंमतीच्या २५ टक्के करावी व ती मालमत्तेची किंमत आकारतांना धरावी असें मंडळानें सुचविलें आहे. तोटा अनिश्चित कालपर्यंत वळता करावा अशी सूचना केली आहे. कंपन्यांच्या न वांटलेल्या नफ्यावर जी रुपयामागें १ आणा करांत सवलत मिळते ती चालू रहावी. यामुळें नफ्याची गुंतवण वाढेल. तसेंच कांहीं विशिष्ट उद्योगधंद्यांना, नवीन बसवलेल्या कायम स्वरूपाच्या मालमत्तेवर त्यांच्या किंमतीच्या ⅓ इतकी रक्कम ज्या वर्षी मालमत्ता उभी केली असेल त्यावर्षींच्या उत्पन्नांतून खर्ची घालण्याची सवलत मिळावी. यामुळें मालमत्ता-उभारणी किंवा पुनःस्थापना यांना उत्तेजन मिळेल. ज्या उद्योगधंद्यांना घसाऱ्याची सवलत नाहीं त्यांनाच ही मिळावी. शिवाय हे धंदे राष्ट्रीय विकासाच्या दृष्टीनें महत्त्वाचे असावेत. या सवलतीशिवाय त्यांची वाढ खुंटण्याची शक्यता असावी. शिवाय कांहीं महत्त्वाच्या धंद्यांना पुढील ६ वर्षेपर्यंत करमाफी मिळावी. या सवलतीचा फेरविचार पांच वर्षांनीं करावा.

'बोनस' भागांवर कर बसवूं नये अशीहि सूचना आहे. कारण 'बोनस' भाग कोणत्याहि अर्थानें 'उत्पन्न' ठरूं शकत नाहींत. यामुळें सरकारी उत्पन्न घटणार नाहीं. हल्लीं लहान कंपन्यांना कॉर्पोरेशन टॅक्समध्यें सूट मिळते ती सर्वच कंपन्यांना लागू करावी. उत्पन्नाच्या पहिल्या टप्प्यावर – उदा० २५००० रु. पर्यंत – कराचा दर माफक असावा. या विलोभनामुळें धंद्यांतील गुंतवण वाढेल.

राष्ट्रीय बचत वाढविण्याच्या दृष्टीनें प्रासिकर-आकारणीच्या वेळीं जो विमाहप्त्यांवर ठराविक प्रमाणांत रिबेट (सूट) मिळतो तो वाढवावा. त्याची मर्यादा अविभक्त कुटुम्बाच्या उत्पन्नाच्या ⅙ पासून ⅕ पर्यंत किंवा जास्तींत जास्त १६००० रु. पर्यंत वाढवावी. व इतरांच्या बाबतींत ८००० रु. पर्यंत वाढवावी. यामुळें विम्याची संवय वाढून बचतहि वाढेल.

तसेंच सध्यांची करमाफीची १५०० रु. ची मर्यादा विवाहितांच्या बाबतींत १००० रु. पर्यंत उतरवावी. हिंदु अविभक्त कुटुम्बाला हल्लीं ८४०० रु. उत्पन्नापर्यंत कराची सूट मिळते. ती मर्यादा १२६०० रु. पर्यंत वाढविण्यांत यावी. यामुळें बचत वाढण्यास मदत होईल.

खनिज पदार्थांची निपज अधिक व्हावी म्हणून खाणींनाहि सवलती देण्यांत आल्या आहेत. रॉयल्टीची रक्कम वाजवी खर्चांत धरावी. व संशोधनावर झालेला खर्च त्या वर्षींच्या उत्पन्नावर भागवावा.

(ब) करांचें उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टीनें केलेल्या सूचना विविध प्रकारच्या आहेत. १. प्रासिकर. २. जिंदगीकर. ३. आयात-निर्यात कर ४. अन्तर्गत कर. ५. विक्रीकर. ६ शेतसारा व शेतीच्या उत्पन्नावरील कर. ७. रेल्वे दर. ८. करवसुली व चुकवेपणा.

(१) प्रासिकर-मंडळाच्या मतें Super-Tax नें करवाढीची अत्युच्च मर्यादा गाठलेली आहे. १॥ लाख उत्पन्नावरील उत्पन्नावर शे. ८५ किंवा १ रुपयांतील १३½ आणे इतका हा कर आहे. यांत आतां वाढ करणें इष्ट नाहीं. मात्र प्रासिकर व उच्च कर यांच्या खालच्या पातळींतच कर देणारे अधिक असतात. म्हणून हे कर वाढवावेत. त्यायोगें उत्पन्न वाढेल. करसुटीची मर्यादा ३००० रु. पर्यंत उतरविण्यानेंहि उत्पन्न वाढेल. कष्टार्जित उत्पन्नावरील सवलत फक्त २४००० रु. पर्यंत वार्षिक उत्पन्न असलेल्यांनाच द्यावी. पुढें इतर प्रकारच्या उत्पन्नाचेच दर लागू व्हावे. वर विमा-सवलती, विवाहितांना सवलती, सक्ती ठेव व जादा करयोजना यांचा उल्लेख आला आहेच.

२. जिंदगीकर: अनुभवानें जिंदगीकराची व्याप्ति व दर वाढवितां येतील. करमाफीच्या रकमेची मर्यादा हल्लींपेक्षां कमी करावी. हल्लीं मृत्यूपूर्वी २ वर्षांत केलेलीं दानें करपात्र ठरतात. ही मुदत ५ वर्षें करावी.

३. आयात-निर्यातकर: आयातकर वाढवून उत्पन्न फारसें वाढणार नाहीं. घासलेट व पट्रोल यांवरील आयात जकातीचें उत्पन्न घटेल; पण याच वस्तूंच्या अंतर्गत उत्पादनावर कर बसवून तें भरून काढावें. आन्तरराष्ट्रीय करारनामे करतांना व्यापारवृद्धि व








उत्पन्नवाढ या दोन्ही गोष्टींकडे लक्ष असावें.

४. **अन्तर्गत कर :** अन्तर्गत कर फलदायी व्हावयाचे असतील तर ते नित्योपयोगी वस्तूंवरच बसवावे लागतात. एका दृष्टीनें ते प्रतिगामी स्वरूपाचे आहेत. पण भारताच्या सद्यःस्थितींत असे अप्रत्यक्ष कर न बसवून चालणार नाहीं. तथापि यांतहि तारतम्य दाखवून चैनीच्या व श्रीमंतांच्या वापरण्यांतील वस्तूंवर अधिक वाढ चढत्या श्रेणींत कर बसवून प्रतिगामिता कमी करतां येईल, हें तारतम्य मंडळानें दाखविलें आहे.

सर्व प्रकारच्या कापडावरील करांत थोडी वाढ शक्य आहे. काड्याच्या पेट्यांवर कर बसवावा. पण 'लहान प्रमाणा'वर तयार केलेल्या काड्याच्या पेट्यांच्या करांत सवलत द्यावी. स्वस्त दराच्या सिगरेटीवरील कर कमी करून तो भारी किंमतीच्या सिगरेटीवर वाढवावा. साखर, घासलेट, सुटा व पॅकबंद चहा, यांजवरील कर वाढवावे. लोंकरीचें कापड, विजेचे दिवे, विजेच्या बॅटरी, कागद (हातानें केलेला वगळून), शिवण्याचीं यंत्रें, रंग आणि व्हार्निशें, बिस्किटें, चिनी मातीचें सामान, कांचसामान, वायुपूर्ण (aerated) पेयें, वनस्पति-तेल (घाण्याचीं तेलें सोडून) – यांवर नवीन कर बसवावे. या सर्व करांमुळें केंद्र-सरकारचें उत्पन्न शें. ४०।४५ टक्के वाढेल असा अंदाज आहे.

५. **विक्रीकर :** हा कर राज्यसरकारांच्या कक्षेंतच राहावयास पाहिजे. तो सेवासदृश (Services) गोष्टींना लागू केल्यास कारभारविषयक अडचणी उत्पन्न होतील. वर्तमानपत्रांवर विक्रीकर बसवून फायदा नाहीं. सर्व करव्यवस्थेचा प्रथम पद एकमुखी (First Stage Single Point) कराचा उपयोग असला तरी त्याचा सार्वत्रिक अवलंब इष्ट नाहीं. कमी दराचा बहुमुखी विक्रीकर हिशेबाला सोपा, पण उत्पन्नाला कमी आहे. विक्रीकर अनेक वस्तूंवर व अनेक व्यापाऱ्यांवर बसत असल्यानें माफक दरांत मोठें उत्पन्न मिळतें.

भविष्यकाळांत विक्रीकर अगदीं खालच्या पातळींतील उत्पन्नापर्यंत पोंचावा असें मंडळाला वाटतें. ५००० रु. किंवा अधिक उलाढाल (turn-over) असणाऱ्यांना बहुमुखी कर लागू व्हावा. त्याचा दर शें. ½ टक्यांपेक्षां अधिक नसावा. एकमुखी कराची मर्यादा मात्र अधिक असावी. उदा०, ३०,००० रु. एकमुखी कराचें प्रमाण व करपात्र व्यापाऱ्यांची संख्या ही प्रत्येक राज्यानें आपल्या उत्पन्नानुसार व इतर गरजांनुसार ठरवावी. गरीब लोकांच्या राहणी-खर्चांत समाविष्ट होणाऱ्या वस्तूंखेरीज इतर वस्तूंच्या विक्रीवर भारी कर बसवावा. तसेंच एकमुखी कर सर्वच गोष्टींवर सारखा असण्याचें कारण नाहीं. लवचिक पद्धतीनें राज्यांचें उत्पन्न वाढेल व करपद्धति साधी व सुटसुटीत होईल.

६. **शेतसारा व शेतीचे उत्पन्नावरील कर :** हल्लीं शेतसारा डोईजड राहिलेला नाहीं. शेतसाऱ्याबाबत सर्व राज्यांनीं समान धोरण स्वीकारावें असें मंडळाला वाटतें. ३००० रु. वरील शेती उत्पन्नावर चढत्या श्रेणीनें सारा बसवावा. भविष्यकालीं शेतीचें व बिगर-शेतीचें उत्पन्न एकत्र करून कर-आकारणी करण्याचें धोरण असावें.

७. **रेल्वेचे दर कर म्हणून** उपयोगिण्यास मंडळाची हरकत नाहीं.

८. **करवसुली व चुकवेपणा :** कर देण्याचं टाळणें व कर चुकविणें यामुळें सरकारी उत्पन्नांत खोट येते व प्रामाणिकपणें कर देणाऱ्यांवर मात्र करांचा बोजा अधिक पडतो. म्हणून या बाबतींत लोकांची सदसद्विवेकबुद्धि जागृत करणें अगत्याचें आहे.

करवसुलीची अंमलबजावणी अधिक कडक होण्यासाठीं मंडळानें पुढील सूचना केल्या आहेत: हल्लींची 'बाह्यतः पहाणी' अधिक कडक व्हावी. 'पडताळा' (collation) खात्याचें काम वाढवावें. 'विशेष विभागा'-(Special Circle) मध्यें सुधारणा होऊन 'अवघड' खात्यांची आकारणी त्वरित व्हावी; प्राप्तिकर-अधिकाऱ्यांना प्रवेश व तपासणीचे अधिक अधिकार द्यावेत. विशेष प्रकारच्या चुकवाचुकवीकरितां हायकोर्ट न्यायाधिशाच्या अध्यक्षत्वाखालीं एक स्वतंत्र चौकशी-मंडळ नेमावें व करव्यवस्थेचा तो एक कायमचाच भाग रहावा.

## करव्यवस्थेंत अधिक एकसूत्रीपणा कसा येईल ?

भारत आतां एकसंध राष्ट्र झालें आहे. त्यामुळें त्याची करव्यवस्था एकात्म (Integrated) स्वरूपाची होणें आवश्यक आहे. यासाठीं मंडळानें भारतीय घटनेच्या २६३ व्या कलमाखालीं एक अखिल-भारतीय करमंडळ स्थापन करावें असें सुचविलें असून








त्याच्याकडे केंद्र-सरकार व राज्यें यांच्या करविषयक धोरणांत सुसूत्रता आणण्याचें काम राहील. या मंडळाला एक कायमचें सचिवालय रहावयाचें असून तें 'कर-संशोधन-केंद्र' म्हणून मध्यवर्ती अर्थखात्याशीं संलग्न राहील. ही करधोरणांतील एकवाक्यता विशेषेंकरून वस्तु-विषयक असे जे कर आहेत त्यांच्या बाबतींत फारच जरूरीची आहे. या करांत हल्लीं विक्रीकर उत्पन्नाच्या दृष्टीनें श्रेष्ठ आहे. त्याबाबत मंडळानें विशेष सूचना केल्या आहेत. वस्तूंची आंतरराज्यीय खरेदी-विक्री सतत चालू असते. म्हणून राज्यांनीं आपापसांत या करासंबंधीं निश्चित व समान भूमिका स्वीकारली पाहिजे. तसेंच केंद्र सरकार व राज्य-सरकारें यांनीं सुद्धां आपले संबंध स्पष्ट करून घेतले पाहिजेत. याबाबत मंडळानें पुढीलप्रमाणें सूचना केल्या आहेत : विक्रीकर राज्यांच्या कक्षेंतच राहिला पाहिजे; मात्र ज्या क्षणीं एका राज्याचा विक्रीकर दुसऱ्या राज्यांतील व्यापाऱ्यांवर बसेल व त्या दुसऱ्या राज्यांतील ग्राहकांकडून वसूल केला जाईल, त्या क्षणीं पहिल्या राज्याची सत्ता व जबाबदारी संपते व केंद्र सरकारची सुरूं होते. म्हणून आंतरराज्यीय विक्रीचे व्यवहार केंद्र-सरकारच्या कक्षेंतच रहावे. आंतरराज्यीय विक्री-व्यवहारांवरील कराचा दर माफक असावा. केंद्रीय विक्रीकराचा कायदा पार्लमेंटनें करावयाचा असून आकारणी व वसुलीबाबतचे अधिकार राज्यांना द्यावयाचे आहेत. कराची वांटणीसुद्धां पार्लमेंटनेंच करावयाची आहे.

शेतसारा व शेती-उत्पन्नकर याबाबतसुद्धां राज्य-सरकारांनीं समान धोरण वापरावें अशी सूचना मंडळानें केली आहे.

### स्थानिक संस्थांना अधिक पैसा

ग्रामीण विभागांत उत्पादन, संपत्तीची वांटणी इत्यादि आर्थिक व्यवहारांची जबाबदारी ग्रामपंचायतींकडे सोंपविण्याची घाई करूं नये. सावधानतेचें व सबुरीचें धोरण ठेवावें. ग्रामपंचायतींना कांहीं विशिष्ट कामगिऱ्या नेमून द्याव्या आणि त्यांचें कार्य जिल्हाबोर्डें आणि तत्सम संस्था यांच्या कार्याशीं जुळतें असावें. करांच्या उत्पन्नाचा ठराविक भाग स्थानिक संस्थांना देण्यापेक्षां त्यांना प्रत्यक्ष मदत करणेंच मंडळाला अधिक प्रशस्त वाटतें. स्थानिक संस्थांचे म्हणून कांहीं खास कर राखून ठेवण्यासाठीं घटनादुरुस्तीची आवश्यकता आहे असें मंडळाला वाटत नाहीं. पुढील कर स्थानिक संस्थांनीं अगर संस्थांकरितां उपयोगावे असें मंडळानें सुचविलें आहे : जमिनी व इमारतीवरील कर; दस्तुऱ्या; यंत्राखेरीज चालणाऱ्या वाहनांवरील कर; जनावरें होड्या यांवरील कर; व्यवसाय, व्यापार आणि नोकऱ्या यांवरील कर; वर्तमानपत्रांतील जाहिराती सोडून इतर जाहिरातींवरील कर; इतर कांहीं कर–नाट्यगृहें वगैरेवरील कर; जिंदगीच्या अदलाबदलीवरील कर; रस्ते व जलमार्ग यावरून जाणारे प्रवासी व माल यांजवरील कर – इत्यादि. मोटारवाहन-करांतील उत्पन्नाचा भाग स्थानिक संस्थांना द्यावा.

कर-चौकशी-मंडळाच्या सूचनांचा जो सारांश प्रसिद्ध झाला आहे, त्यांतील ठळक मुद्द्यांचा येथें धावता परामर्श घेण्यांत आला आहे. त्यावरून हें लक्षांत येईल कीं मंडळाच्या शिफारसी 'क्रांतिकारक' स्वरूपाच्या नसल्या तरी भरपूर प्रमाणांत पुरोगामी स्वरूपाच्या आहेत. त्यांच्या मतें खाजगी उपक्रमाला अजून भरभूर वाव असून त्यांना योग्य तें उत्तेजन मिळालें पाहिजे. ह्या उद्देशानें त्यांनीं सवलती सुचविल्या आहेत. आर्थिक विषमता नष्ट करण्यावर मंडळानें विशेष भर दिला असून प्राप्तिकर-वाढ, जिंदगी-कर, सक्तीच्या ठेवींच्या वगैरे योजना मांडल्या आहेत. मात्र सूचनांना प्रत्यक्ष व्यवहारांत स्थान मिळावें अशी मंडळाची इच्छा असल्यानें त्यांनीं अप्रत्यक्ष करांसारख्या अप्रिय सूचना करण्यासहि मागेंपुढें पाहिलें नाहीं. करव्यवस्थेला एकसूत्रता यावी याकरतां त्यांनीं केलेल्या सूचनांना सद्य:स्थितींत विशेष महत्त्व आहे.

या शिफारशींची उपयुक्तता किती आहे हें श्री. चिंतामणराव देशमुख यांनीं त्यांतील बऱ्याच सूचनांचा चालू अर्थसंकल्पांत स्वीकार केला आहे त्यावरूनच दिसून येईल. प्राप्तिकरांतील सवलती, घसारा, तोटा वगैरेंतील सवलती, अन्तर्गत करांबाबतच्या सूचना यांचा स्वीकार त्यांनीं तावडतोब केला आहे व बाकीच्यांचाहि क्रमाक्रमानें करण्याचें आश्वासन त्यांनीं दिलें आहे. श्री. चिंतामणराव देशमुख यांनीं आपल्या भाषणांत म्हटल्याप्रमाणें पुढील कांहीं काळांत या अहवालाची सरकारच्या करविषयक धोरणावर छाया पडेल. भविष्यकालीन धोरणाची रूपरेषा करचौकशी-मंडळानें आंखून दिली आहे.












# भूदान-यज्ञाची गंगोत्री : पोचमपल्ली

प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

भूदानगंगेचें विशाल होत चाललेलें पात्र जगन्नाथपुरीला पाहिलें. दोन वर्षांच्या अवधींत सागराला जाऊन मिळण्याची तिची प्रतिज्ञा ऐकली. पूज्य विनोबाजींच्या समवेत तिच्या तीरावरून पदयात्रा करीत तिच्या पवित्रतेचा व गंभीरतेचाहि कांहींसा प्रत्यय अनुभवाला आला. परंतु भूदानगंगेचा उगम ज्या ठिकाणीं झाला त्या स्थळाची यात्रा चुकणार ही रुखरुख सारखी मनाला लागून राहिली होती.

परंतु मनांतील इच्छा पूर्ण होण्याचेच ते दिवस होते. भूदान-यज्ञ-चळवळीचा अभ्यास करीत यात्रा करणारे 'टाटा इन्स्टिटयूट ऑफ् स्पेशल सायन्सेस'चे रीचर्स स्कॉलर्स श्री. पटवर्धन व श्री. आपटे यांची परतीच्या प्रवासाला सुरवात केली असतांना भुवनेश्वर स्टेशनवर अचानक गांठ पडली. यापूर्वी संमेलनांत आमचा परिचय झाला होता. पदयात्रेंतहि एक दिवस ते आले होते. परंतु नंतर आमचे मार्ग फुटले होते व पुन्हां मुंबईला पोहोंचेपर्यंत आमची भेट होईल अशी अपेक्षाहि नव्हती. परंतु अचानक योग जुळून आला. ते पोचमपल्लीलाच निघाले होते. मी माझा परतीचा रस्ता बदलला आणि त्यांच्याबरोबर हैद्राबादला आलों.

पोचमपल्ली हें गांव हैद्राबादपासून सुमारें ३० मैलांच्या अंतरावर आहे. माझ्या मनाशीं मी जें पोचमपल्लीचें चित्र रेखाटलें होतें त्यांत कल्पनेचाच भाग अधिक होता. अज्ञानहि पुष्कळ होतें. हैद्राबादपासून सुमारें १०० मैलांवर अगदीं आडबाजूला पोचमपल्ली हें एक लहानसें खेडेंगांव असेल, आजूबाजूला उंच डोंगर असतील, जाण्यायेण्यास पाऊलवाटेखेरीज दुसरा मार्ग नसेल, गर्द झाडी असेल, दुमदार झोंपड्या असतील, अर्धनग्न शेतकरी, हरिजन जमीन कसत असतील, माती तांबडी असेल– असें कांहींसें तें चित्र होतें. रम्यतेची हौस म्हणून माझ्या मनानें तसें चित्र रंगविलें असावें. मावळ-भागांतील व कोकणांतील पाहिलेल्या खेड्यांच्या अनुरोधानेंच हें चित्र रेखाटलें –रंगविलें गेलें होतें हें उघड आहे. कल्पनेची दरिद्रता व भूगोलाचें अज्ञान यांखेरीज याचें दुसरें काय कारण सांगतां येईल ?

पोचमपल्ली भोंगीर–तालुक्यांत सुमारें ३००० वस्तीचें गांव आहे. पूर्वी या ठिकाणीं बांगड्यांचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर होत असे. यामुळें गुजाल ( बांगडी ) पोचमपल्ली असें नांवहि पूर्वी या गांवाला होतें. आजचें पोचमपल्ली हें साधें नांव 'पोचम्मा' या देवीच्या नांवावरून पडलें आहे. पोचम्मा ही देवीच्या सांथीची देवी होय. आज या गांवांत बांगड्यांचा धंदा राहिला नाहीं. परंतु विणकऱ्यांचा धंदा येथें खूप मोठया प्रमाणावर चालतो. येथील कारागिरांची विणाई मशहूर आहे. येथें विणलेलीं कापडें, लुंग्या अरबस्तान, इराक, मध्यपूर्वेतील देश येथपर्यंत जाऊन पोंचतात. दरमहा सुमारें २०००० रुपयांचे विणलेले कापड येथून बाहेर पाठविलें जातें असें आम्हांला सांगण्यांत आलें. गांवांत हरिजन, धोबी, कलाल, धनगर, कुंभार यांच्या जवळजवळ परंतु वेगवेगळया वस्त्या आहेत. पोलीसचौकी आहे. एक नवीनच बांधलेली टुमदार प्राथमिक शाळा आहे. दररोज हैद्राबादहून मोटारसर्व्हिस आहे. पोलीस-ॲक्शन-पूर्वीचें जमीनदारीचें गांव म्हणून एकूण प्रगतीच्या बाबतींत गांव मागासलेलें राहिलें आहे. अजूनहि पुरेशी जागृति झालेली नाहीं. प्रत्यक्ष वस्तीचीं ठिकाणें स्वच्छ वाटलीं परंतु सार्वजनिक अशा सर्व जागांवर अस्वच्छता आढळून येत होती. तीन हजार वस्तीच्या मानानें गांवांत लोकांची येजा हालचालहि कमीच आढळून आली. एक मजली चुन्यांत गच बांधून काढलेल्या कांहीं इमारती, जमीनदारांचे वाडे आहेत. परंतु एक साधारण मोठा दरवाजा व रस्त्याच्या बाजूला एक-दोन लहान आकाराच्या लुकलुकत्या खिडक्या यांमुळें घरादारांकडे पाहिलें तरीदेखील एक प्रकारची








निःस्तब्ध उदासीनता जाणवते. सायंकाळीं सरकारनें दिलेला रेडिओ एक अक्षरहि कोणाला कांहीं कळणार नाहीं अशा कर्कश आवाजांत ओरडत असतो; त्याहून-हि मोठा आवाज काढून तेथें जमलेलीं कांहीं माणसें एकमेकांशीं संभाषण करण्याचा प्रयत्न करीत असतात; व पोलीस-चौकीच्या बुरुजाशेजारील त्या लहानशा चौरसांत धुळींत लहान मुलें गोंधळ घालीत असतात; एवढी काय ती जागृतीची संध्याकाळ तेथें उगवते.

या भागांतील भूप्रदेशहि वेगळा आहे. महाराष्ट्र-गीतांत 'दगडांच्या देशा' असें अभिधान महाराष्ट्राला आपण लावतों. परंतु दगडांचा देश म्हणजे काय याची पुरेशी कल्पना आपल्याला नसते. ती या प्रदेशांत आल्या-नंतर येते. जिकडे पहावें तिकडे मोठमोठ्या हत्तींच्या आकाराच्या किंवा त्याहूनहि अनेक पटींनीं अजस्र अशा काळ्या दगडाच्या शिळाच शिळा पसरलेल्या दिसतात. क्षितिजाजवळ खुजे राकट डोंगर दिसतात. परंतु हे डोंगर म्हणजेहि शिळांचे समूहच असावेत असें बाहेरून भासतें. मेघमालेंत जशीं आपल्या कल्पनेप्रमाणें हवीं तीं चित्रें आपल्याला तयार करतां येतात तशाच या शिळांतून कल्पनेला अनेक चित्रविचित्र आकृती दिसूं शकतात. यांतील कांहीं शिळा समर्पक नांवें देऊन नवशिल्प म्हणून प्रदर्शनांत ठेवण्याचा प्रयोग करून पहाण्यासारखा आहे. ह्या शिळांनीं व्यापून उरलेल्या जागेंत ताडांचीं झाडें आपल्या माना वर काढीत असतात. सगळीकडे पहावें तिकडे हींच झाडें आहेत. या झाडांतहि अनेकदां सभोंवतालीं वडाचें झाड व आंत मध्यंतरीं ताडाच्या झाडाचा माथा असा गंमतीदार प्रकार दिसतो. कावळ्यांनीं आणलेल्या वडाच्या बिया ताडाच्या तोडलेल्या फांद्यांच्या खोबणींत जाऊन बसतात. आणि मग हळूहळू ताडाला लपेटून वडाचें झाड वाढूं लागतें. हा प्रकार या भागांत सगळीकडे दिसतो.

ऋषीचें कूळ आणि नदीचें मूळ शोधूं नये म्हणतात. परंतु भूदान-गंगेचें मूळ शोधण्याची इच्छा माझ्या मनांत अनेक दिवस वास करून होती. पुरीच्या संमेलनांत हैद्राबादच्या भूदानचळवळींतील प्रमुख कार्यकर्ते श्री. अच्युतभाई देशपांडे यांचा परिचय झाला होता. त्यांनीं आस्थेवाईकपणें सर्व साहाय्य दिलें. हैद्राबादप्रदेश–भूदानयज्ञ–समितीचे संयोजक श्री. उमेंनला केशवराव यांनींहि आपलेपणानें सर्व मदत केली. आम्ही पोचमपल्लीला गेलों त्याच वेळीं भूदान-सप्ताहांतील पदयात्रा सुरू करण्यासाठीं ते तेथें आले होते. त्यांनीं गांवांत आमचा परिचय करून दिला. सर्व व्यवस्था लावून दिली व विश्वासानें सर्व माहिती पुरविली. पहिले भूदान देणारे श्री. रामचंद्र रेड्डी कांहीं कारणामुळें आमच्याबरोबर पोचमपल्लीला येऊं शकले नाहींत. परंतु हैद्राबादला एक दिवस ते तीन तास भूदानाच्या पहिल्या दिवसाची कथा सांगत होते. त्यांना सांगण्याचा आळस नाहीं व आम्हाला ऐकण्याचा कंटाळा नाहीं. श्री. रेड्डी यांचें व्यक्तिमत्त्व उत्साह आणि स्नेहशीलता यांनीं भरलेलें आहे. त्यांचें शालेय व कॉलेजचें शिक्षण पुण्याला न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेजमध्यें झालें. पुण्याचा त्यांना विलक्षण अभिमान आहे. लॉचा अभ्यासहि त्यांनीं पुरा केलेला आहे. निरोपाच्या वेळीं आम्हां तिघांना स्नेहालिंगन देऊन 'दिल चाहता नहि लेकिन जाना है' असें सांगून ते रिक्शांत बसले त्या वेळीं या उद्गारामागें केवळ कोरडा उपचार नसून कांहीं हार्दिकता आहे असें वाटल्याखेरीज राहिलें नाहीं.

तीन तास श्री. रामचंद्र रेड्डी भूदानाच्या सुरुवाती-ची हकीगत सांगत होते आणि आम्ही ऐकत होतों. त्यांच्या ठिकाणीं अहंता दिसली नाहीं. परंतु भूदानाची चळवळ आपल्या दानामुळें सुरू झाली याचा सार्थ अभिमान त्यांना जरूर आहे. ते सांगत असतांना श्री. आपटे टिपणें घेत होते. एखादा महत्त्वाचा मुद्दा आला कीं 'अे बहोत important है लिख लोऽऽ' असें ते अगदीं गाण्याच्या सुरांत हेल काढून आग्रहानें बजावीत. श्री. रामचंद्र रेड्डी यांनीं सांगितलेली हकीगत व भूदानाच्या पहिल्या दिवशीं उपस्थित असलेल्या इतरांनीं नंतर सांगितलेली हकीगत यांत कांहीं तपशिलाचा फरक जाणवला. पहिल्या दिवसाची माहिती तपशीलवार समजून घेण्याची मला उत्कंठा असल्यामुळें हा फरक मला जरासा खुपला. परंतु हेतुपुरस्सर असा विपर्यास कोणीहि केला नाहीं. प्रत्यक्ष साक्षीदारांच्या स्मृतींतहि कालान्तरानें कसा फरक पडत जातो याचें हें एक उदाहरण पहावयास मिळालें इतकेंच.

भूदानाच्या पहिल्या दिवसाची उजळणी अनेकदां अनेकांनीं केली आहे. परंतु तरीहि तें कीर्तन पुन्हां










एकदां करण्याचा मोह आवरत नाहीं. इतिहासाच्या दृष्टीनेंहि एकवार ही कथा सुसंगतपणें मांडण्याचा प्रयत्न करावा असाहि यांत एक हेतु आहे.

शिवरामपल्लीचें सर्वोदय संमेलन १३ एप्रिल १९५१ रोजीं संपलें. १६ एप्रिल रोजीं विनोबाजींची पदयात्रा सुरू झाली. सुरवातीचे मुक्काम हयातनगरम्, बाटसिंगवरम् या ठिकाणीं झाले. यात्रा मोठ्या रस्त्यानेंच चालली होती. नंतर मोठ्या रस्त्यानें पुढें जाण्याऐवजीं आडरस्त्यानें विनोबाजी पोचमपल्लीकडे वळले. या सर्व भागांत कम्युनिस्टांचा धुमाकुळ अनेक दिवस चालू होता. ठिकठिकाणीं पोलीसचौक्या होत्या. खुद्द पोचमपल्लींत डाकबंगला कम्युनिस्टांनीं जाळला होता. गांवाच्या हद्दींत कोणाला ठार मारलें नव्हतें पण गांवांतील दोन लोक गांवाबाहेर इतरत्र मारले गेले होते. अजूनहि वातावरण धगधगतच होतें विनोबा पोचमपल्लीहून चेन्नवेरू ('छोटी नदी') उतरून भीमनपल्लीला गेल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं त्या परिसरांत पोलिसांची व कम्युनिस्टांची चकमक होऊन तीन कम्युनिस्ट ठार झाले. परंतु विनोबाजींच्या पदयात्रेंत कम्युनिस्टांनीं त्यांना प्रत्यक्ष असा विरोध केला नाहीं किंवा त्रास दिला नाहीं. गांधीजींची पुण्याई विनोबाजींच्या पाठीशीं उभी होती हें याचें मुख्य कारण होय. लोक विनोबाजींना गांधीजींचा मुलगा म्हणून ओळखीत होते; आणि लोक कम्युनिस्टांचें इतर कांहींहि ऐकत असले तरी जनमनांतील गांधीजींच्याविषयींची आदराची भावना अढळ राहिली होती. या भावनेला दुखविण्याचा धोका कम्युनिस्टांनीं पत्करला नाहीं.

मुख्य रस्त्यापासून सुमारें आठ मैल आंत चालून येऊन सकाळीं ९ च्या सुमारास विनोबाजी पोचमपल्लीला येऊन पोहोंचले. आम्रपल्लवांनीं मार्गाची सजावट केली होती. आसपासच्या गांवांतून अनेक लोक विनोबाजींच्या दर्शनासाठीं आले होते. येतांना विनोबाजींना अर्पण करण्यासाठीं गोरस आणला होता. त्या दिवशीं गोरसाचा नुसता पूर लागला होता. इतक्या गोरसाचें करावयाचें तरी काय अशी महादेवीताईंना विवंचना पडली. — सुवासिनींनीं मंगलारति ओवाळली. विनोबाजींनीं विचारलें : 'पुरुषसूक्त कोणाला येतें काय ?'

गांवांत रंगाचारी नांवाचे पुरुषसूक्त जाणणारे आहेत. त्यांनीं पुरुषसूक्त म्हटलें.

डाक-बंगला जळालेला होता. विनोबाजींना उतरण्यासाठीं त्यांतल्या त्यांत सोयीची अशी जागा आशुरखाना ही मुसलमानांची ताबुत तयार करण्याची जागा तेवढीच होती. एका लांब सोप्याच्या बाजूला दोन पडव्या आहेत. पुढें चार फूट उंचीच्या भिंतीनें घेरलेला एक चौक आहे. आजहि या जागेंत शिरलें म्हणजे एखाद्या जुनाट पडीक जागेंत फिरल्यासारखें वाटतें. आज ही जागा 'विनोबामंदिर' या नांवानें ओळखली जाते. परंतु ती नीटस स्वच्छ ठेवण्याची दक्षता कोणी घेतांना दिसत नाहीं. ज्या ठिकाणीं पहिलें भूदान झालें ती सायंप्रार्थनेची जागा आशुरखान्याच्या समोरच आहे. हा एक सुमारें दहा हात लांबीरुंदीचा कट्टा आहे. सांचतसांचत आलेल्या मातीच्या ढिगाऱ्यावर हा बांधला गेल्यासारखा वाटतो. जमिनीपासून साधारण उंची चारएक फूट असावी. या जुनाट कट्ट्याची भलीमोठी दगडाची पायरी पालथी होऊन कोसळल्यासारखी त्याच्या तळाशीं पडून आहे. कट्ट्याच्या वरचा बैठकीचा भाग ओबडधोबड उंचसखल आहे. तेथें चोपून बसवलेले लहानलहान दगड, गारगोट्या हळूहळू निसटून बाहेर येत आहेत. कांहींशा भावयुक्त अंतःकरणानें व कांहींशा स्मृतिचिन्हें गोळा करण्याच्या हव्यासानें यांतील दोन लहानसे दगड काढून मी बरोबर आणले. या ठिकाणीं पहिल्या भूदानाचें स्मारक म्हणून कांहीं चिन्ह उभारावें अशी एक कल्पना आज कार्यकर्त्यांच्या व सरकारच्याहि मनांत आहे. विनोबाजी अशा प्रकारच्या वास्तुस्मारकाला फारसे उत्सुक नाहींत म्हणूनच आजवर हें काम लांबणीवर पडत आलें आहे.

विनोबाजी आशुरखान्यांत आल्यानंतर पोचमपल्लींतील हरिजन, धोबी, विणकर, धनगर यांची त्यांच्याशीं गटागटानें भेट करविण्यांत आली. पोचमपल्लींत सुमारें ८० हरिजन-कुटुंबें आहेत. हरिजनांची कामें करण्यांसाठीं सरकारकडून त्यांना सुमारें सहा एकर तरी (बागाईत) जमीन इनाम मिळाली आहे. ती जमीन ते एकत्र कसतात. ही एकत्र कसण्याची पद्धत 'मेटी'— पद्धत या नांवानें ओळखली जाते. हरिजनांना एकूण आठ 'मेट्या' आहेत. प्रत्येक मेटींत कांहीं कुटुंबांचा

समावेश असतो. इनाम जमीन कसण्यासाठीं प्रत्येक मेटी मदत करते व उत्पन्न आठ भागांत सारखें वाटलें जातें. नंतर मेटींतील कुटुंबांच्या संख्येप्रमाणें प्रत्येक कुटुंबाला या भागांतील आपली वांटणी मिळते. सरकारकडून इनाम मिळालेली जमीन धोबी वगैरे जमातीहि याच 'मेटी'—पद्धतीनें कसतात. एखाद्याची वैयक्तिक जमीन असल्यास तो ती स्वतंत्रपणें कसतो. अशी जमीन फारच थोड्या लोकांची असते.

ऐंशी कुटुंबांना सहा एकर जमीन अगदींच तुटपुंजी पडते यांत नवल नाहीं. आपल्याला जमीन अपुरी पडते, जमीन जवळजवळ नाहींच हें आपलें गाऱ्हाणें हरिजनांनीं विनोबाजींच्या पुढें मांडलें. सरकारांतून खटपट करून कांहीं जमीन विनोबाजी मिळवून देऊं शकतील अशी त्यांची अपेक्षा होती.

'तुम्हाला किती जमीन पाहिजे ?' विनोबाजींनीं विचारलें.

'ऐंशी एकर'.

विनोबाजींनीं हरिजनांकडून जमिनीसाठीं सरकारांत द्यावयाचे अर्ज घेतले.

सायंकाळीं समोरच्या कट्ट्याचेंच व्यासपीठ करून प्रार्थना घेण्यांत आली. कट्ट्याच्या डाव्या उजव्या बाजूला पिंपळ व कडुलिंबाचीं झाडें चवऱ्या ढाळीत उभीं होतीं. गीतेंतील स्थितप्रज्ञाच्या लक्षणांचे तेलगु भाषेंत पठन सुरू झालें. विनोबाजी तेलगुहि जाणतात, हें पाहून लोकांच्या मनांत प्रेमाश्चर्याची एक लहर उसळून गेली. प्रार्थनेनंतरच्या प्रवचनांत हरिजनांचा प्रश्न विनोबाजींनीं सांगितला. सहज सुचलें म्हणून ते म्हणाले : "सरकारकडून जरूर ती जमीन मिळेल किंवा मिळणार नाहीं. निदान मिळावयास कांहीं अवधि लागेल. हरिजनांच्यासाठीं गांवांतीलच कोणी जमीन देऊं शकणार नाहीं काय ?"

श्री. रामचंद्र रेड्डी तेथेंच जवळ होते. पोचमपल्ली हें त्यांचें गांव. त्यांचें कुटुंबहि पुढारलेलें व प्रसिद्ध. प्रसिद्ध कम्युनिस्ट पुढारी रविनारायण रेड्डी यांना श्री. रामचंद्र यांची बहिण दिलेली आहे. त्यामुळें एक प्रमुख ग्रामस्थ म्हणून, विनोबाजी आपल्या गांवीं येणार हें कळतांच ते अगत्यानें स्वागतासाठीं आले होते.

विनोबाजींचा प्रश्न ऐकतांच श्री. रामचंद्र रेड्डींच्या मनांत एक कल्पना चमकली. १९५० च्या मार्च महिन्यांत श्री. रामचंद्र रेड्डींचे वडील वारले. आपल्या नांवानें कांहीं भूमिदान केलें जावें अशी अखेरची इच्छा त्यांनीं प्रदर्शित केली होती. परंतु हें भूमिदान कोणत्या योग्य रीतीनें करावें या विवंचनेंत श्री. रामचंद्र रेड्डी होते. विनोबाजींचा प्रश्न कानीं पडतांच दानाचा मार्ग त्यांना सांपडला. संतपुरुषाच्या हातून आपलें दान दिलें जाणार या आनंदाच्या उत्साहानें ते म्हणाले, "मी आपली शंभर एकर जमीन देतों."

साऱ्या सभेवर विलक्षण परिणाम झाला. विनोबाजींचाहि प्रथम आपल्या कानावर विश्वास बसला नाहीं.

'मुझे भरोसा नहीं!' विनोबाजींच्या मुखांतून उद्गार बाहेर पडले.

श्री. रामचंद्र रेड्डी आम्हाला सांगत होते : "विनोबाजींचे हे शब्द ऐकून मला राग आला. मी वकील एल्‌एल्‌. बी. आहे. कांहीं दिवस वकिली केली आहे. मी भराभर कागद घेऊन 'डाक्युमेंट' लिहूं लागलों. इतकें स्वच्छ इंग्लिश मी जन्मांत आतांपर्यंत लिहिलें नाहीं. ताबडतोब कागद लिहून दिला. जमिनीची सविस्तर माहिती दिली."

पहिलें दानपत्र लिहिलें गेलें.

विनोबाजींना अत्यानंद झाला. हर्षखेदाच्या अतीत स्थितप्रज्ञाच्या भूमिकेवर वावरणारा हा संतपुरुष आनंदानें नाचूं लागला. कितीतरी वेळ उजव्या पायानें ठेका देत विनोबाजी जागच्या जागीं उभे राहून डुलत होते. जनतेचा उत्साहहि कळसाला पोंचला होता. रामधुनीचा गजर आकाशापर्यंत जाऊन पोंचत होता. रामधुन थांबते असें वाटलें कीं '**अदीगूडा पाडंडी**'च्या गर्जनेनें लोक पुन्हां धुन घेत होते.

आदल्या रात्रींच कार्यकर्त्यांशीं बोलताना विनोबाजी म्हणाले होते : "मी यात्रा तर सुरू केली आहे. परंतु यापासून काय मिळणार ? मी लोकांना काय देऊं शकेन ?"

"आपल्या यात्रेमुळें त्रस्त जनतेच्या मनाला जो धीर मिळेल त्याचें आम्हाला अमोल महत्त्व वाटतें" असें कार्यकर्त्यांनीं सांगितलें होतें.

कालपर्यंत भूदानाची कल्पनाहि कोणाच्या मनांत नव्हती. आज अचानक दानगंगेचा प्रवाह उमटला होता. ईश्वरी संकेताची प्रेरणा या दानांतून विनोबाजींना









अनुक्रमणिका

मिळाली.

दुसरे दिवशीं पहाटे ३ वाजतां विनोबाजींनीं श्री. रामचंद्र रेड्डी यांना बोलावून घेतलें. दान मिळालेल्या जमिनीसाठीं एक विश्वस्त-मंडळ नेमण्याची सूचना केली. पांच जणांचें एक विश्वस्त-मंडळ नेमण्यांत आलें. हरिजनांपैकीं मादिगा ( धेड ) व माला ( महार ) यांचेहि प्रतिनिधी या पांचजणांत घेण्यांत आले.

त्या दिवसाचा पडाव तंगेळपल्लीला झाला. तेथें दोन जमीनदार-भावांतील भांडण मिटविण्याचा विनोबाजींनीं प्रयत्न केला. त्या दोघांपैकीं एक जण विनोबाजींच्या बरोबर यात्रेंत होता. त्यानें १५० एकर जमीन दान दिली. पुढचा पडाव सर्वेल येथें झाला. तेथें एक सर्वोदय-आश्रम होता. सर्वेलला कार्यकर्त्यांच्या छोट्या सभेंत विनोबाजी म्हणाले : " गरीबांना जमीन देण्याबाबत माझी व कम्युनिस्टांची भावना एकच आहे. परंतु ते हिंसेच्या मार्गानें जातात. मी अहिंसेच्या मार्गानें जाऊं इच्छितों. "

गंगेच्या प्रवाहाला आतां गति मिळाली होती. आपल्या ध्येयसागराची दिशाहि त्याला समजली होती. यानंतर भूमिविषयक भांडणें मिटविणें व भूदान मिळविणें हींच कार्यकर्त्यांचीं प्रमुख कामें झालीं.

पोचमपल्लीला आम्ही येऊन पोहोंचलों. त्या वेळीं सायंकाळ झाली होती. आम्ही आलेले पाहून कांहींनीं 'कशाला आलांत ? दुरून डोंगर साजरे!' असा इशारा दिला. तर कांहींनीं ' डोंगर जवळून साजरे वाटत नसले तरी त्यांचें निकटचें सौन्दर्यहि निरखण्यासारखें असतें ' असें आश्वासन दिलें. या आश्वासनाचा प्रत्यय पोचमपल्लीच्या मुक्कामांत आम्हाला आला.

भूदानाच्या वातावरणानें भूदान-गंगोत्री भारून गेलेली असेल अशी जर कोणी कल्पना केली तर ती चुकीची ठरेल. इतर गांवांतील वातावरणाप्रमाणेंच येथील वातावरणहि बहुतांशीं स्तब्ध व जड आहे. बहुसंख्य विणकर लोकांचा जमिनीशीं संबंध नाहीं. भूदान मिळालेल्या लोकांना आपल्याला कांहीं मिळालें आहे याची कल्पना आहे. परंतु तें कां व कोणी दिलें याची स्पष्ट जाणीव नाहीं. जमीनदार लोक सवडीसवडीनें अगदीं अटळ होईल तेवढी जमीन देऊन बाकीची जमीन कशी वांचवितां येईल किंवा विकतां येईल या विवंचनेंत आहेत. भूदान-गंगोत्री म्हणून पोचमपल्लींत कांहीं विशेष करून दाखवावें, अशी टोंचणी कार्यकर्त्यांच्या मनांत आहे. विनोबाजींचेंहि विशेष लक्ष या गांवाकडे आहे. श्री. रामचंद्र रेड्डी यांच्याशीं झालेल्या संभाषणांत त्यांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें " ए बहोत important है. note करो " असें उच्च आरोह-अवरोहांत सांगून " पोचमपल्लींत लवकरच सर्व जमीन दान मिळेल. मजूर मिळत नसल्यामुळें जमीनदारांना जमीन द्यावीच लागेल. लवकरच ' पोचमपल्लीमें समन्वयाश्रम स्थापन होनेवाला है– लिख लो' " असें आमच्याकडून नोंदवून घेतलें होतें. समन्वयाश्रमाची श्री. रामचंद्र रेड्डी यांची कल्पना विशद करून घेण्याच्या खटाटोपांत आम्ही पडलों नाहीं. परंतु गांवांत कांहीं विशेष नवजीवन संचरलें आहे किंवा लवकरच संचरेल अशीं प्रसादचिन्हें आमच्या तरी आढळांत आलीं नाहींत. धिम्या गतीनें प्रगतिपथावरचीं पोचमपल्लीचीं पाउलें पडत आहेत इतकेंच.

पोचमपल्लीविषयीं बाहेरून अनेक गोष्टी ऐकल्या होत्या. लोकांची नैतिक उंची वाढली आहे, आर्थिक स्थिति सुधारली आहे, भांडणें, तंटेबखेडे कमी झाले आहेत, मद्यपान कमी प्रमाणांत होत आहे, प्रौढ-शिक्षण-वर्ग चालतो, प्रत्येक सोमवारीं सफाईचा कार्यक्रम होतो, बालकांना नीट स्नान घालण्यांत येतें, पिण्याच्या पाण्याच्या जागांची स्वच्छता सांभाळली जाते, सोमवारीं संध्याकाळीं भजन होतें, लोकनृत्याचे कार्यक्रम होतात, सार्वजनिक रेडिओ ऐकण्यासाठीं आस्थेनें दररोज ५०।६० लोक जमतात, समानतेची भावना रुजत आहे, अस्पृश्यता नष्ट झाली आहे, एका मोठ्या मंदिराखेरीज इतरत्र अस्पृश्यांना प्रवेश मिळतो, हिंदी प्रौढ-शिक्षणाचा वर्ग चालतो, खादी-केंद्र चालतें, 'विनोबा ग्रन्थालयम्' नांवाचें वाचनालय आहे, विणकऱ्यांची सहकारी संस्था आहे, भूहीन कोणीहि राहिलेला नाहीं, सर्व जातीजमातींचें सहभोजन होतें, ३० जानेवारी, २६ जानेवारी, २ आक्टोबर हे दिन साजरे होतात, प्रभात व सायंप्रार्थना होतात, ' विष्णुपादम् ' नांवाची एक ग्रामोन्नतीची चळवळ तीन महिन्यापूर्वी सुरूं करण्यांत आलेली आहे, तिचे सभासद प्रतिज्ञा घेतात, या चळवळीचा आसपास-







च्या गांवांवरहि परिणाम होऊं लागला आहे, इत्यादि वर्णन आम्हीं ऐकलें होतें.

या सर्व गोष्टींत तथ्य आहे आणि नाहींहि. समाज-विकास-योजना, सर्वोदय-केंद्रें किंवा कोणतेंहि विधायक कार्याचें केंद्र यांच्या छापील वृत्तान्तांत व प्रत्यक्ष परिस्थितींत जो फरक आढळून येत असतो तोच येथेंहि आढळतो. अनेक उद्योग सुरूं केले जातात. कांहीं कागदोपत्रीं राहतात. कांहीं सुरूं होऊन कालान्तरानें विरतात. कांहीं मात्र मूळ धरतात. ही स्थिति पाहून निराश व्हावें कीं अधिक उत्साहानें कामाला लागावें हा ज्याच्या त्याच्या प्रवृत्तीचा व पूर्वानुभवाचा प्रश्न आहे. पोचमपल्लींत आज अशीच स्थिति आहे. पोचमपल्लीकडे आज सर्वांचेंच विशेष लक्ष आहे. गांधी-स्मारकनिधीचे, सर्वोदयाचे कार्यकर्ते तेथें काम करीत आहेत. सरकारहि लक्ष घालीत आहे. सवलती व आर्थिक मदत देण्यास उत्सुक आहे. या बाहेरील मदतीच्या आधारावर कांहीं काम उभें होत आहे. परंतु अखेर खेड्यांतील विकासाचा पाया खेडूत लोकांचें स्वावलंबन हाच आहे हा धडा भारतांतील इतर असंख्य खेडेगांवांप्रमाणें पोचमपल्लीनेंहि अद्याप आत्मसात् करावयाचा आहे.

भूदानाचा संदेशहि पोचमपल्लीनें अजून पूर्णपणें आत्मसात् केलेला नाहीं. गेल्या १८ एप्रिलपासून भूदान-सप्ताहाची पदयात्रा पोचमपल्लीपासून सुरूं व्हावयाची होती अशा पदयात्रा काढाव्यात हें पुरीच्या संमेलनांत ठरलें. त्यानंतर पुरेसा प्रचार करावयास अवधि उरला नाहीं. गांवांतील लोकांना १८ तारखेच्या प्रभात-प्रार्थनेनंतर अशी यात्रा सुरूं होणार आहे याची कल्पना नव्हती. त्यामुळें सकाळीं लोकांना मुद्दाम बोलावून आणावें लागलें. सुमारें शंभर मंडळी हजर होती. भूदानाचा संदेश पुन्हा सांगण्यांत आला. परंतु कोणाच्या मुखावर विशेष उत्साह दिसला नाहीं. बाहेरची भूदान-संयोजक-मंडळी आलेली व आपल्याकडेच पाहुणे म्हणून उतरलेली, यामुळें कांहीं जमिनदार पुढे टाकलेल्या सतरंजीवर बसले होते. त्यांच्या जमिनीवर धाड पडण्याचा संभव असल्यामुळें ते साहजिकच कांहींसे सावधान होते. परंतु येथील जमिनदारांची भूमिकाहि अपेक्षित स्वार्थी भूमिकेहून वेगळी वाटली नाहीं. कुळांनीं कायद्याप्रमाणें खंड द्यावा नाहींतर जमिनी विकत घ्याव्यात– या आपल्या भूमिकेच्या प्रामाणिकपणाविषयीं त्यांना शंका नव्हती. एकदां भूदान दिल्यावर उरलेल्या जमिनीच्या कुळांच्या वतीनें कार्यकर्त्यांनीं हस्तक्षेप करूं नये अशीहि त्यांची अपेक्षा दिसली. हा हस्तक्षेप त्यांना किती झोंबत होता हें " एकवेळ कम्युनिस्ट परवडले पण हे सर्वोदयवाले नकोत ! "–ह्या एका जमीनदाराच्या जळजळीत उद्गारांवरून आढळून आलें. जमीन कोणत्याहि मार्गानें घेतली तरी ती सोडतांना त्यांचें अंतरंग सारखेंच तुटतांना दिसत होतें. ' आप काटते नहीं निछोडते हैं ' अशी भावना त्यांच्या दानामागें दिसे. ' आमच्या कुटुंबाच्या खर्चाची सोय लावा आणि आमची सर्व जमीन खुशाल घ्या '– असें ते सांगत. कुटुंबाच्या खर्चाची सोय कोणत्या जीवनमानाप्रमाणें लावावयाची असें खोदून विचारलें तर मात्र प्रश्न टाळून ते मुग्धता स्वीकारीत असत. भूदान-संयोजकांच्या आदरातिथ्याची व्यवस्था त्यांनीं जितक्या अगत्यानें केली तितक्याच अगत्यानें आमच्या दोन दिवसांच्या निवासांत आम्हालाहि पाहुणचार दिला. आपली भूमिकाहि मोकळेपणानें समजावून सांगितली. जमीन आपल्या हातीं फार दिवस आतां राहणार नाहीं ही गोष्ट त्यांना उमगली आहे. परंतु हृदय-परिवर्तनाचा मागमूस मात्र आम्हांला कोठें लागला नाहीं.

ज्या भूहीनांना जमीन देण्यांत आली त्यांनाहि भूदानामागील तत्त्वज्ञानाची कल्पना नसावी याचें विशेष आश्चर्य वाटलें. हरिजन भूहीनांना जमीन देण्यांत आलेली आहे, त्याप्रमाणें धोबी-भूहीनांनाहि देण्यांत आलेली आहे. हरिजनवस्तींत माहिती गोळा करण्यासाठीं श्री. पटवर्धन व श्री. आपटे गेले. मी धोब्यांच्या कडून माहिती जमविली. आदल्या रात्रीं निरोप पाठवून धोबी लोकांना मुद्दाम बोलावण्यांत आलें होतें. तेहि अगत्यानें आले होते. कांहींनीं तर मुद्दाम ठेवणींतील ठाकठीकीचा पोशाख केला होता. हरिजन व धोबी दोघांनाहि सरकारांतून हरिजनकामाबद्दल व धोबीकामाबद्दल इनाम जमिनी आहेत. या जमिनी दोघांच्याहि बाबतींत अगदींच तुटपुंज्या आहेत. दोघेहि भेटीपद्धतीनेंच जमिनी कसतात. हरिजनांच्या आठ भेट्या आहेत व धोब्यांच्या बारा आहेत इतकाच फरक.

गांधीस्मारक-निधीचे कार्यकर्ते श्री. सिद्धेश्वरजी







दुभाष्याचें काम करीत होते. आमचीं प्रश्नोत्तरें झालीं:

" धोबी-जातींत एकूण कुटुंबें किती ? "

" पन्नास. "

" कुटुंबाचें सरासरी वार्षिक उत्पन्न ? "

" रु. ३००. "

" कसें मिळतें ?

" मजूरीनें. स्त्रिया धोबीकाम करतात. त्याबद्दल निरनिराळ्या घरांतून एक वेळचें जेवण मिळतें. धोबीकामाचे किरकोळ पैसे मिळतात, त्याचे सुमारें ३० रुपये वर्षाला मिळतात. "

" सरकारकडून इनाम जमीन किती ? "

"१० एकर तरी ( बागाईत ) व १२ एकर खुष्की ( जिराइत ). "

" याखेरीज इतर जमीन ? "

" ओढ्याजवळची पांच एकर जमीन ४० कुटुंबांनीं मिळून आपल्या श्रमानें मशागतीखालीं आणली. ती जमीन गटागटानें कसतात. "

" भूदानांत किती जमीन मिळाली ? "

" ३८ एकर खुष्की व २ एकर तरी. "

" एकूण उत्पन्न किती आलें ? "

" यंदा पाऊस नीट न झाल्यामुळें कमी आलें. गत वर्षी खुष्की जमिनींतून ४ खंडी व तरींतून दीड खंडी आलें होतें. "

" कोणतीं पिकें ? "

" तांदूळ, बाजरी, साळी, एरंडी. "

" खाजगी कर्ज ? "

" नाहीं. लग्नकार्यासाठीं लागल्यास धोबीकाम करतों त्या घरांतून हातउसने घेतों. "

" कोर्ट-झगडे ? "

" नाहींत ? "

" मेस्त्या किती ? "

" बारा. "

" भूदानांत मिळालेल्या जमिनींतून प्रत्येक कुटुंबाला वार्षिक उत्पन्न साधारणपणें किती मिळतें ? "

" दहाबारा रुपये. "

" जमीन कशी आहे ? "

" खुष्कींत फार उत्पन्न येऊं शकत नाहीं. परंतु जमीन भिजविण्याची सोय झाल्यास अर्धीअधिक खुष्की जमीन तरी होऊं शकेल. "

" भूदानांत मिळालेल्या जमिनीच्या मशागतीसाठीं, बैल नांगर वगैरेसाठीं कर्ज काढलें काय ? "

" होय. "

" किती ? "

" ६०० रु. "

" कोणाकडून ? "

" कोऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटीकडून. "

बराच वेळ हीं प्रश्नोत्तरं चाललीं होतीं. त्यांनीं दिलेली माहिती मी उलटसुलट प्रश्न विचारून ताडून घेत होतों.

सर्व प्रश्न संपल्यानंतर शेवटीं मी विचारलें :

" भूदानाच्या मागें कोणती कल्पना, कोणतें तत्त्वज्ञान आहे हें समजलें आहे काय ? "

श्री. सिद्धेश्वर यांनीं प्रश्न त्यांना नीट समजावून सांगितला. परंतु कोणताहि अर्थबोध होत असल्याचें चिन्ह त्या भूहीनांच्या मुखावर दिसलें नाहीं.

मग श्री. सिद्धेश्वर त्यांना समजावून सांगूं लागले. त्या तेलगु-भाषेतील एक अक्षरहि मला कळत नव्हतें. परंतु सारे भूहीन एकाग्र होऊन ऐकत होते आणि एकेक गोष्ट समजतांच त्यांच्या मुद्रा आनंदानें, आश्चर्यानें उजळून निघत होत्या, हें मी पहात होतों.

भूदानामागील रहस्य भूदानाच्या गंगोत्रीच्या ठिकाणींहि भूहीनांना समजावून सांगण्यांत आलें नव्हतें याचें मला आश्चर्य वाटलें.

हें रहस्य उलगडून सांगितलें जात असतां सहजपणें उजळून आलेली त्या भावुक भूहीनांची मुद्रा ही माझी भूदान-गंगोत्रीच्या यात्रेंतील सर्वांत स्पष्ट स्मृति आहे.

## उडिया-भागवत व उडिया लिपि

ओरिसामध्यें भूदान-कार्याकरितां पदयात्रा सुरू केल्यावर **आचार्य विनोबांनीं** दोन गोष्टी करावयाचें ठरविलें : एक, उडिया भाषेंत रचलेल्या भागवताचा अभ्यास व दुसरी उडिया लिपीची सुधारणा. उडिया-भागवताच्या पठनामुळें त्यांनीं जनतेचीं अंतःकरणें खेंचून घेतलीं आहेत. उडिया-लिपीच्या सुधारणा-योजनेमुळें, सुशिक्षितांचें लक्ष त्यांनीं वेधून घेतलें आहे. ओरिसाचे शिक्षणमंत्री, ओरिसा विद्यापीठाचे उपकुलगुरु आणि इतर साहित्यिक हे विनोबांबरोबर लिपिसुधारणेबाबत बोलणीं करीत असून, विनोबांच्या लोकनागरी लिपीपाठीमागील शास्त्रीय दृष्टि त्यांना पटूं लागली आहे.

—' हरिजन ' ( १४-१-'५५ ) वरून.








डॉ. माधव सदाशिव केळकर

# धर्मशिक्षणाची दिशा

उत्क्रांतिवादाप्रमाणें मनुष्य सर्वांत उन्नत प्राणी आहे. पण आतांपर्यंतच्या इतिहासावरून, धर्मामुळें एकीकडे थोड्या व्यक्तींनीं आपली व समाजाची उन्नति केली, तर बहुसंख्य माणसांनीं धर्माच्या नांवावर अनन्वित कृत्यें करून, पशूहून नीच कोटीस जाऊन, हजारों-वर्षांची उत्क्रांति मातीमोल केली.

भारताच्या घटनेंत प्रचलित धर्मांना स्थान नाहीं, तरी हिंदू लोकांस आपल्या धर्माचा अभिमान वाटून, कांहींना हिंदू राष्ट्र स्थापण्याची इच्छा आहे. पाश्चात्त्य देशांत लोकसत्ता व समाजसत्ता असे दोन गट होऊन, दोन्ही तिसऱ्या महायुद्धाची तयारी करीत आहेत. सर्वांना शांतता पाहिजे असें म्हणण्यांत येतें, पण तिच्यासाठीं युद्धाच्या तयारीशिवाय दुसरा मार्ग दिसत नाहीं. याचें कारण माणसाला आपली माणुसकी कशांत आहे याची अजून नीट जाणीव झाली नाहीं. अशा वेळीं समाजधारणेला जरूर असा धर्म कोणता व त्याचा प्रसार कसा करावा हे महत्त्वाचे प्रश्न आहेत.

## मनुष्यधर्माचा पाया

पृथ्वीवर मनुष्य उत्पन्न झाल्यापासून, त्याला मी शरीरापासून निराळा आहे ही जाणीव झाल्यामुळें, त्याचें जीवन केवळ शारीरिक न राहतां, आत्मिक गुणांस पोषक झालें. हीच मनुष्यधर्माची सुरवात होय.

आत्म्याची मुख्य शक्ति विचार करणें असून, ती लहान मुलांमध्येंहि दिसते. विचार करायला मूळ अनुभवांचा आधार लागतो. हे अनुभव जितके जास्त तितका विचार अधिक बरोबर होऊं शकतो. विचार करण्याचें कारण जीवनांतील अनेक प्रसंगीं कसें वागावें हें ठरविणें असतें. विचार बरोबर आहे कीं नाहीं याची परीक्षा जीवनांतच होत असतें. यावरून जीवनाबाहेर विचार नाहीं, जीवनाहून भिन्न कल्पनाहि मनुष्यास होऊं शकत नाहीं म्हणून जीवनाबाहेर धर्म नाहीं हें मूळ तत्त्व लक्षांत ठेवलें पाहिजे. लहानपणीं मुलाची काळजी वडील माणसें घेतात. यामुळें बऱ्याच गोष्टींत विचार करण्याचें त्याला कारण पडत नाहीं. आणि त्याला अनुभव कमी असल्यामुळें नीट विचार करतांहि येणार नाहीं. यामुळें त्याची विचारशक्ति कमी होऊन, रूढ आचार व कल्पना पूर्वींच्या लोकांनीं विचार करून प्रचारांत आणल्या आहेत, म्हणून त्या बरोबर आहेत अशी त्याची कल्पना होते. प्रत्येक पिढीस आधींच्या अनुभवांचा फायदा मिळत असतो व साधारण मनुष्य तेवढ्यांत संतोष मानून स्वतः विचार करण्याचें टाळतो. तरी कांहीं माणसें नवीन नवीन अनुभवांवरून विचार करून, कांहीं नवीन आचार प्रचारांत आणतात. याप्रमाणें मनुष्यजातीच्या ज्ञानांत भर पडून, माणसांचें वर्तन अधिक विचारी होत जातें. यास संस्कृति म्हणतात. यांत नीतीचा व धर्माचा अंतर्भाव होतो. साध्या शब्दांत यास माणुसकी म्हणतात. दुसऱ्यांस त्रास न देतां, स्वकष्टानें जगणें व शक्य तर दुसऱ्यांस मदत करणें हाच धर्म, हीच नीति व हीच माणुसकी होय. यांत रूढीमुळें विचार कमी होऊन, शारीरिक सुखांची इच्छा वाढते तेव्हां स्वकष्टाऐवजीं दुसऱ्याच्या श्रमावर चैन करण्याची बुद्धि होते. यांत शरीराचे कांहीं नियम मोडल्यामुळें, आरोग्य कमी होऊन, रोग व दुःखें वाढतात, आणि मनुष्याचा ऱ्हास होतो. हा ऱ्हास थांबवण्यास प्रत्येकास स्वतः विचार करून वागण्यास शिकविलें पाहिजे.

मनुष्य स्वप्रयत्नानें, स्वतःच्या अनुभवांवरून विचार करून शिकतो हें तत्त्व प्राचीन काळीं अमलांत येत होतें. पण जसजसें ज्ञान वाढत चाललें, तसतसे ग्रंथ तयार होऊन, ते लहानपणापासून शिकविणें सुरू झालें. ग्रंथाच्या प्रती थोड्या म्हणून ते शिकण्यास पाठ करणें अवश्य झालें; लहान वयांत पाठशक्ति अधिक म्हणून अर्थ न समजला तरी कांहीं पाठ करणें सुरू होऊन, तेंच शिक्षणाचें मुख्य अंग झालें. यामुळें स्वतः विचार










करणें कमी झालें. रोजचे सर्व व्यवहार रूढीनें बांधले जाऊन, ते करणें हा धर्म झाला. याबरोबर व्यवहारांतील नैतिक आचरणास संस्कृति समजण्याऐवजीं, प्राचीन ग्रंथांतील विचारांस संस्कृति समजणें सुरू झालें व मनुष्याची दृष्टि भविष्याकडून भूतकालाकडे वळली. यामुळें आत्मिक जाणीव व विचार करून वागणें अधिकच कमी होऊन, तत्त्वज्ञानाच्या नांवावर अनात्मवाद, नास्तिकवाद इत्यादि अनेक ' वाद ' माजले, आणि धर्म व व्यवहार यांचा संबंध सुटला. याप्रमाणें आत्मिक जाणीव व विचार करणें कमी झाल्यामुळें मनुष्याचा ऱ्हास झाला.

आतांपर्यंत धर्माचा ऱ्हास होण्याचें एक कारण धर्माची सुरवात आत्मजागृतीपासून न करतां, ईश्वर मानून त्याची भक्ति करा असें सांगणें हें आहे. आत्मजागृति झाल्यावर, सृष्टींतील घडामोडी हेतुपूर्वक होत आहेत असें दिसून, सृष्टींतहि आत्मिक शक्ति काम करीत आहे असें वाटतें. पुढें अनेक प्रसंगीं या शक्तीची आपणांस मदत होते, असा अनुभव आल्यावर परमात्म्यावर श्रद्धा बसते; व आत्मिक विकासासाठीं ऐहिक जीवन जगण्यांत आनंद व समाधान होतें. हे अनुभव येण्यास आत्मिक व्यक्तित्वाची जाणीव होणें जरूर आहे. ही जाणीव नसतां, लहानपणापासून देवाचीं स्तुतिपर व प्रार्थनापर कविता म्हणण्यानें, आपण देवासंबंधीं व धर्मासंबंधीं कर्तव्य केलें अशी भलती समजूत होऊन, धर्माचा व्यवहाराशीं संबंध सुटतो, व आत्मिक जाणीव नसल्यामुळें व्यवहारांत नीति राहात नाहीं. आत्मजागृतीशिवाय आपल्या चुकांची जाणीव होत नाहीं व त्या पुनः न होण्यासाठीं परमात्म्याची प्रार्थना होत नाहीं. " मला अमूक दे, मला संकटांतून सोडव " अशा प्रार्थना साधारण लोक करतात. देवाच्या कृपेनें आपण जगत आहों ही जाणीव आत्मजागृतीनंतर होते व मग कांहीं मागणें शिल्लक राहात नाहीं. ' तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी। ऐसे मज हरी कळों आलें । ' असा अनुभव आल्यावर ऐहिक गोष्टी मागण्याची बुद्धि होत नाहीं. या आत्मिक धर्माची सुरवात ईश्वर मानण्यापासून होत नसून, आत्मजागृतीपासून होते. एका श्लोकांत या जागृतीचें महत्त्व सांगितलें आहे, तो असा :

' देहात्मबुद्धिजं पापं न तत् गोवधकोटिभिः ।
आत्माहंबुद्धिजं पुण्यं न भूतो न भविष्यति । '

प्रत्येक मनुष्य विचार करूं शकतो, पण रूढीमुळें, विशेषतः धर्मासंबंधीं संतप्रामाण्य व ग्रंथप्रामाण्य मानलें पाहिजे या समजुतीमुळें बरेच सुशिक्षित लोक स्वतः विचार करण्याचें टाळतात. याचा परिणाम आत्मजागृति न होतां शारीरिक जीवन वाढण्यांत होतो व धर्मासारख्या महत्त्वाच्या बाबतींत आपण धार्मिक आहों हें दाखविण्यासाठीं कांहींतरी रूढ आचार पाळून, दांभिकपणा वाढतो. हिंदू लोकांत मुंजीच्या विधीस महत्त्व राहिलें नसतां, हजारों रुपये खर्चून मुंजी होतात. यांत धर्म नसून, आपल्या श्रीमंतीचें प्रदर्शन असतें. सर्व धर्मांत ग्रंथप्रामाण्य आहे. पण त्यामुळें जेव्हां आपल्या इच्छेविरुद्ध वागावें लागतें तेव्हां प्रत्येक जण आपल्यास अनुकूल असा आधार पहातो किंवा जुन्या वचनांचा अर्थ आपणांस हवा तसा लावतो. म्हणून मनुस्मृतींत श्रुति, स्मृति व सदाचाराच्या नंतर ' स्वस्य च प्रियमात्मनः ' म्हणजे आपणांस प्रिय असेल तें असा धर्माचा आधार दिला आहे. सैतानहि बायबलचा आधार घेऊं शकतो अशी इंग्रजींत म्हण आहे. याप्रमाणें प्रत्येक मनुष्य आपल्या इच्छेप्रमाणें वागतो हें स्पष्ट दिसत असतां, ग्रंथप्रामाण्य, मूर्तिपूजा व इतर ' धार्मिक ' आचारांचें खूळ चालू राहण्याचें कारण,त्यामुळें धर्माधिकाऱ्यांचा बडेजाव चालत असतो व त्यांच्यामुळें समाजांत श्रीमंतांस वाटेल तसें वागतां येतें, हें होय. कार्ल मार्क्सनें धर्म ही गरीबांना दडपण्यासाठीं काढलेली अफूची गोळी आहे असें जें म्हटलें तें खऱ्या आत्मिक धर्मास लागूं नसून, धर्माच्या नांवावर चाललेल्या अधर्मास लागूं आहे.

## नीतीचा पाया आत्मिक धर्मच

ईश्वर न मानतां समाजांत नीति राहूं शकेल असें कांहीं लोकांचें मत आहे. ' आपल्याशीं दुसऱ्यानें जसें वागावें असें आपणास वाटतें तसें आपण दुसऱ्याशीं वागावें '– या पायावर समाजांत नीति राहूं शकते असें या लोकांचें म्हणणें आहे. जैन व बौद्ध अनात्मवादी असून अहिंसा, सत्य, अस्तेय इत्यादि नीतिनियम पाळण्यास सांगतात. गेल्या शतकांतील भौतिक शास्त्रज्ञ नास्तिक असून नीति पाळणारे होते, व सध्यांहि तसे कांहीं लोक आहेत.

केवळ शारीरिक सुखांचा उपभोग घेणें हें ध्येय असलें तरी शरीराची रचनाच अशी आहे कीं शारी-



अनुक्रमणिका






रिक श्रम व खाण्यापिण्यांत संयम असल्याशिवाय आरोग्य राहात नाहीं व सुख मिळत नाहीं. म्हणून ९० वर्षांचा शूद्रहि वंदनीय आहे असें म्हटलें आहे. सामाजिक जीवन सुखी होण्यासाठीं सर्वांनीं आपलें शरीर निरोगी ठेवण्याचा यत्न केला म्हणजे शारीरिक जीवनांत संयम व समाजांत समता येऊन, सध्यांचे बहुतेक प्रश्न सुटतील. हेंच ध्येय 'साधी राहणी व उच्च विचारसरणि' असें सांगतां येईल. आजपर्यंत बहुसंख्य लोकांच्या आचरणांत हें न येण्याचें कारण त्यांच्या मूळ स्वरूपाची जाणीव न होतां, धर्माच्या नांवांवर भलत्या रूढ कल्पनांनीं त्यांची विचारशक्ति मारली जाणें हें होय.

## शरीरास चालविणारी शक्ति आत्मिक

शरीरांतील सर्व इंद्रियें असंख्य जिवंत पेशी मिळून झालेलीं आहेत व त्यांना योग्य व पुरेसें अन्नपाणी दिलें म्हणजे सर्व इंद्रियें आपापलीं कामें करतात. यामुळें शरीराचें जीवन आपल्या इच्छाशक्तीशिवाय आपोआप चालतें, शरीराचें आरोग्य आपल्या इच्छेवर नाहीं अशी साधारण समजूत आहे. सर्व इंद्रियांच्या कामांचें नियंत्रण मेंदूकडून होतें म्हणून मनुष्याचें व्यक्तित्व मेंदूच्या जीवनावर अवलंबून आहे अशी भलतीच कल्पना जडवादी शास्त्रज्ञांनीं काढली होती. तिच्यामुळें शरीराच्या मृत्यूनंतर मनुष्याचें व्यक्तित्व राहात नाहीं असें अजून कित्येकांस वाटतें. कित्येक आधुनिक शोधांमुळें शरीर हें पूर्णपणें आपोआप चालणारें यंत्र नाहीं असें स्पष्ट झालें आहे. ज्ञानेंद्रियांनीं ज्ञान होण्यास व्यक्तीचें तिकडे लक्ष असावें लागतें व असें लक्ष देतांना व्यक्तीची कांहीं शक्ति खर्च होते असें वुइल्यम जेम्स या मानसशास्त्रज्ञानें म्हटलें आहे. शरीरांत सर्व हालचाल करणारे स्नायू इच्छेप्रमाणेंच हालतात व जे स्नायू बरेच दिवस हालत नाहींत ते हळूहळू अशक्त होतात असें शारीरशास्त्र सांगतें, इतकेंच नाहीं तर ऐच्छिक स्नायूंच्या कामाच्या प्रमाणांत रक्ताभिसरण, श्वसन, पचन इत्यादि सर्व कामें होतात. सर्व शरीर मिळून काम करतें असें तत्त्व अलीकडे मान्य झालें आहे. यावरून शरीर आपोआप चालत नसून, आपल्या शक्तीमुळें स्नायूंना व त्यामुळें इतर इंद्रियांना मिळणाऱ्या चेतनेमुळें चालतें असें म्हणावें लागतें. लक्ष देऊन ज्ञान करून घेणें, त्याचें स्मरण ठेवून त्या आधारें विचार करणें व आपणांस इष्ट त्या क्रिया करणें या सर्वांत आत्मिक शक्ति खर्च होत असते व तिच्यामुळें शरीरांतील सर्व क्रिया नीट होतात. विचारांचा परिणाम चेहेऱ्याच्या ठेवणीवर होतो. डोळयांचा परिणाम इतर माणसांवर व प्राण्यांवर होतो. दुसऱ्याच्या शरीरावर हात फिरवण्यानें व्यक्तीच्या इच्छाशक्तीचा परिणाम होऊन, शारीरिक रोग बरे होऊं शकतात. आत्मिक शक्तींची वाढ झाली म्हणजे दुसऱ्याचे विचार आपणांस समजतात व आपल्या विचारांचें ज्ञान दुसऱ्यास होऊं शकतें. याप्रमाणें शारीरिक जीवनांत प्रत्येक गोष्टींत आत्मिक शक्ति दिसत असतां व व्यक्तीस त्याच्या कृत्याबद्दल जबाबदार धरल्याशिवाय सामाजिक जीवन चालणार नाहीं असें असतां मनुष्याचें देहांतील व्यक्तित्व न मानणें म्हणजे उघड दिसणाऱ्या गोष्टी कबूल न करणें होय.

पूर्वीं जड पदार्थांचें रूपांतर झालें तरी ते नाहींसे होऊं शकत नाहींत असे मानीत. आतां जड पदार्थांचें शक्तींत रूपांतर होऊन ते नाहींसे होऊं शकतात असें कांही शास्त्रज्ञ म्हणतात. हें कांहीं असलें तरी पृथ्वीवरील जीवनांत एकपेशी जीवांत जीवशक्ति आणि अनेक पेशी मिळून झालेल्या प्राण्यांत त्यांचें नियंत्रण करणारी आत्मिक शक्ति अशा दोन चैतन्यशक्ती दिसतात. जीवशक्तीचें मुख्य कार्य मूळ जड पदार्थांचें निरनिराळ्या प्रमाणांत एकीकरण करून, नवीन जड पदार्थ बनविणें हें आहे. आत्मिक शक्तीचें कार्य या जिवंत पेशींची शक्ति व कार्यें वाढवून प्राण्यांच्या शरीराचा विकास करणें हें दिसतें. शरीराची गर्भांतील व नंतरची वाढ पुंबीज व स्त्रीबीजांतील 'जीनीं'च्या शक्तीप्रमाणें होते असें जडवादी म्हणतात. पण उत्क्रांति करणारी शक्ति कोणती आहे हें सांगण्याचें जसें ते टाळतात, तसेंच जीनींमध्यें विशिष्ट प्रकारें शरीराची रचना करण्याची शक्ति कशी आली हें सांगण्याचें ते टाळतात. जीवशक्ति व आपला विकास करण्यासाठीं शरीरांत आलेली आत्मिक शक्ती केव्हां व कशी उत्पन्न झाली हें सांगतां येत नाहीं; पण ज्यांना विचार करून आपलें जीवन सुखी करण्याची इच्छा असेल त्यांनीं स्वतःबद्दल शंका घेऊन, आपली जबाबदारी टाळण्याचें कारण










नाहीं. सध्यांचें जीवन नीट जगण्यास आपल्या ज्ञाना-च्या व इतर शक्तींचा योग्य उपयोग करणें इतकेंच आपलें कर्तव्य आहे व त्यामुळेंच व्यक्तींची व समाजाची उन्नति होईल.

## ' साधी रहाणी व उच्च विचारसरणि '

अपत्यप्रेमामुळें कौटुंबिक जीवन व बंधुप्रेमामुळें सामाजिक जीवन यांची वाढ होते. मनुष्यांत आत्म-जागृतीमुळें विचार करणें वाढल्यामुळें, शरीरानें अशक्त असून, त्यानें इतर प्राण्यांस आपले गुलाम केलें. पुढें बुद्धीच्या हुशारीमुळें उपयुक्त पशू पाळून व शेती करून, थोड्या श्रमांत अन्नवस्त्रांच्या गरजा भागूं लागल्या. तेव्हांपासून शारीरिक सुखाच्या कल्पना बदलत जाऊन, शरीराच्या गरजा वाढूं लागल्या. पण त्याबरोबर देह-भाव वाढून विचार करणें कमी झालें आणि आरोग्याचा ऱ्हास होऊन, मनुष्यजातीच्या ऱ्हासास सुरवात झाली. पुरुषांना श्रम अधिक करावे लागल्यामुळें ते थोडेतरी सशक्त असतात; आणि गर्भारपण, बाळंतपण व मुलांची जोपासना यामुळें स्त्रियांचे श्रम कमी होऊन त्या ' अबला ' होतात. ही सृष्टिनियमःप्रमाणें स्वाभाविक स्थिति आहे अशी कल्पना होऊन, मुलींना अधिक व्यायाम करूं देत नाहींत. यामुळें त्यांची शारीरिक वाढ नीट होत नाहीं. अशा खुजट व अशक्त मुली प्रजोत्पादनास लायक समजल्या जाऊन, मनुष्याचा ऱ्हास अधिक प्रमाणांत होऊं लागला. त्यांत बालविवाहाची भर पडून व १ ते १॥ वर्षांच्या अंतरानें मुलें होऊन, मनुष्याचा ऱ्हास अधिक होऊं लागला. यामुळें गर्भातील वाढ नीट न होऊन, गर्भपात, अपुऱ्या दिवसांचे जन्म व पहिल्या २–३ वर्षांतील मुलांची मृत्युसंख्या अकल्पित वाढली. पुढें मुलांची नीट वाढ न झाल्यामुळें, अनेक रोगांचें प्रमाण वाढून लोकांची शक्ति कमी होते. हा शारीरिक ऱ्हास थांबवण्यास, सध्यांच्या सुखासंबंधींच्या कल्पना बदलून आरोग्यानेंच खरें सुख मिळेल हें समजलें पाहिजे; म्हणजे त्यासाठीं साधें अन्न खाऊन, पुरेसे श्रम करण्यांत आनंद वाटेल. सध्यां गरीबांनीं श्रम करावे व श्रीमंतांनीं स्वस्थ बसून खावें अशा कल्पनेमुळें सामाजिक विषमता व कलह उत्पन्न झाले आहेत. सर्व लोक सुखासाठीं श्रम करूं लागले म्हणजे कलह कमी होतील. आतांपर्यंत खरें आरोग्य न मिळाल्यामुळें मादक विषारी पदार्थ रोजच्या उपयोगांत येऊन त्यावांचून चालायचें नाहीं अशी कल्पना झाली आहे. दारू व तंबाखूमुळें शरीरास ग्लानि येते असें शास्त्रज्ञ सांगतात. तरी हे पदार्थ सोडणें डाक्टरांसहि कठीण वाटतें. पण अन्नांतील तिखट व मसाले बंद केले म्हणजे दारूड्याची दारूहि सुटते असें सिद्ध झाल्यामुळें, दारू व तंबाखू कमी होण्यास लहानपणापासून मुलांस साध्या अन्नाची संवय लावली पाहिजे.

सामाजिक सुधारणेंतील दुसरी गोष्ट स्त्रियांची स्थिति सुधारून, आईबापांच्या पोषणशक्तीपेक्षां अधिक मुलें न होतील अशी काळजी घेणें ही होय. सध्यां स्त्रियांची स्थिति किती हीन आहे याची कल्पना कायद्याप्रमाणें पत्नीच्या इच्छेविरुद्ध पतीला तिच्याशीं संग करण्याचा अधिकार आहे यावरून होते. ही बदलण्यासाठीं स्त्रियांतील व्यक्तित्व जागृत झालें पाहिजे, तरच स्त्री म्हणजे मालकीची भोग्य वस्तु ही पुरुषांची कल्पना बदलेल, व साधें अन्न आणि पुरेसे श्रम यामुळें पुरुषांस ब्रह्मचर्य पाळणें सोपें होईल. साध्या जीवनांतील दुसरें अंग साधा पोषाख हें आहे. तऱ्हेतऱ्हेचे रंगीत व नक्षीचे कपडे व दागिने घालून शरीरसौंदर्य वाढतें ही रानटी स्थितींतील कल्पना जोंपर्यंत जाणार नाहीं तोंपर्यंत मनुष्य संस्कृत झाला असें म्हणतां येणार नाहीं. मुलींचें लग्न होण्यासाठीं त्यांचें सौंदर्य रंग, कपडे व दागिने यांनीं वाढवणें जरुर आहे व नंतर पतीचें आपल्यावर प्रेम राहावें म्हणून पत्नीनें उसन्या साधनांनीं सौंदर्य वाढवणें जरूर आहे—या कल्पना मनुष्याच्या बौद्धिक ऱ्हासाच्या दर्शक आहेत. खरें शारीरिक सौंदर्य आरोग्य, शक्ति व उच्च विचार यामुळें येतें. बऱ्याच प्राण्यांत नर व मादी यांच्या शरीरांत विशेष फरक नसतो व असला तर मोर व सिंहाप्रमाणें नर सुंदर असतो. याचें कारण नराची कामवासना मादीपेक्षां अधिक असते व ती वश होण्यासाठीं हा यत्न असतो. तरी प्राण्यांमध्यें मादीवर नर जुलुम करूं शकत नाहीं. वन्य लोकांतहि रंग व पिसें लावून पुरुष आपलें सौंदर्य वाढवण्याचा अधिक यत्न करतात. पुरुषाचें काम वाढलें व स्त्री अबला झाली तेव्हांपासून ती दासी व मालमत्ता झाली व नवऱ्याच्या श्रीमंतीचें प्रदर्शन करण्याचें स्त्री एक साधन झाली. याप्रमाणें स्त्रियांवर सौंदर्यसाधन पुरुषांनीं लादलें आहे








हें लक्षांत आलें तरच त्यांच्यांतील जागृतीबरोबर कपड्यांचा व दागीन्यांचा सोस कमी होईल. अलीकडे पाश्चात्य देशांत स्त्रियांना आपल्या हीन स्थितीची जाणीव थोड्या प्रमाणांत होत आहे. तीन चतुर्थांश मुलींना आपण पुरुष असतों तर बरें झालें असतें असें वाटतें, पण नाइलाज म्हणून रूढीप्रमाणें केशभूषा व वेशभूषा यांनीं सौंदर्य वाढवणें चालूच आहे. आमच्याकडे गीता सानें व अंबिका वेहेरे यांनीं लग्नानंतर पहिलें नांव कायम ठेवून व मागें ' सौ. ' हें अक्षर न लावून आपलें व्यक्तित्व दाखविलें आहे. पण इतर स्त्रियांत ही जागृति करण्याची खटपट त्यांनीं केली नाहीं. पुरुषांचा ऱ्हास थांबविण्याची जेव्हां पुरुषांना इच्छा होईल तेव्हां मुलींची योग्य वाढ करण्याचें महत्त्व आणि पोषणशक्तीबाहेर मुलें न होऊं देण्याचें महत्त्व समजून समाजांत साधी राहाणी प्रचारांत येईल.

## संगीताचा अंतर्भाव

प्राण्यांपेक्षां मनुष्यांत आत्मिक भावनांचा जो विकास झाला तो गायन, वादन व नृत्य या संगीताच्या तीन भागांमध्यें दिसून येतो. गाण्यानें प्राणीहि देहभाव विसरतात, मग मनुष्य विसरेल यांत नवल नाहीं. मनुष्यांत हाताचें कौशल्यहि वाढण्याचें कारण सौंदर्याची जाणीव होऊन होणारा आनंद होय. यामुळें चित्रकला व मूर्ति करणें यांत मनुष्याच्या कल्पना व भावना व्यक्त होतात. प्राचीन ग्रीसमध्यें शारीरिक वाढीसाठीं व्यायाम करवून मानसिक वाढीसाठीं संगीत व इतर कलांचें शिक्षण देण्यांत येई. सध्यांच्या पुस्तकी शिक्षणाऐवजीं घरोघर हें दोन प्रकारचें शिक्षण लहानपणापासून मिळेल तर आत्मजागृति होऊन, उसन्या साधनांनीं शरीरसौंदर्य वाढवण्याची इच्छा कमी होईल. याबरोबर योग्य वयांत शेती, बागकाम व इतर जरूर तें धंदेशिक्षण दिलें म्हणजे सर्वांच्या निर्वाहापुरतें अन्नवस्त्र उत्पन्न होऊन, सध्यांचे अनेक सामाजिक व आर्थिक प्रश्न सुटतील.

---

## कवितेची कथा !

परागांनीं विणिलेलें
गंधगूढ गीत
जाळविण्याआधीं विरे
लाजून स्वरांत
गक्षजळें ओथंबून
रूमडाची कळी
इंद्रधनूच्या रंगांनीं
मनीं फुलूं आली
अशा वेळीं मातीलाही
अंकुरावें वाटे
मधामधें विरघळती
गुलाबाचे कांटे

उमलते पाण्यावर
निळ्या कमळांची
उर्वशीच्या डोळ्यांतली
धुंदी अमृताची
नक्षत्रांच्या पापण्यांनीं
स्वप्नाळते उरीं
झंकारून शृंगारून
स्मृति जरतारी
अशा वेळीं मोहरतो
स्वर्गी कल्पवृक्ष
गगनाच्या गंधश्वासें
भरून ये वक्ष

शून्यांतल्या निळाईत
साद घाली मन
आणि उठे पडसाद
चांदणें होऊन
अशा मौनीं घडतसे
कवितेची कथा
जन्मभर भोगावी ही
निर्मितीची व्यथा

— आरती प्रभू










आचार्य स. ज. भागवत

# विश्वकवि रवीन्द्रनाथ ठाकुर

[ १९५५ मे ला, रवीन्द्रनाथांच्या श्राद्धदिनीं आ. स. ज. भागवत यांचें पुणें नभोवाणीवर भाषण झालें. तें येथें पुणें नभोवाणी-अधिकाऱ्यांच्या अनुज्ञेनें दिलें आहे. — का. सं.]

राजा राममोहन राय यांना आधुनिक भारताच्या निर्मात्यांत प्रथम स्थान देण्यांत येतें. खरोखरींच ते पहिले आधुनिक भारतीय पुरुष होऊन गेले. त्यांच्या मृत्यूला सव्वाशें वर्षें होत आहेत. त्यांनीं बंगालमध्यें नव्या विचारांना प्रथम प्रेरणा दिली. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत समन्वयाची दृष्टि वापरून राजा राममोहन राय यांनीं बंगालच्या द्वारें भारताला नव जागृतीचा मंत्र दिला. आधुनिक बंगाली साहित्याच्या दृष्टीनें पाहिलें तरीदेखील राजा राममोहन राय यांचें कार्य महत्त्वाचें आहे. इतर आधुनिक भारतीय भाषांप्रमाणेंच बंगालीचें पूर्व साहित्य पद्यमयच आहे. बंगाली गद्याचा पाया राजा राममोहन राय यांनीं नव्यानेंच घालून दिला. बंकिमचंद्रांनीं त्या गद्यामध्यें सौंदर्याचा नवा आविष्कार करून दिला. आणि रवीन्द्रनाथांनीं बंगाली गद्य कळसास पोंचविलें. एवढ्या एकाच कार्यासाठीं रवीन्द्रनाथांचें नांव बंगाली साहित्यांत अमर होण्यासारखें आहे. तथापि, राजा राममोहन राय आणि बंकिमचंद्र या दोघांनीं सुरू केलेल्या सर्व प्रवृत्तींचा पूर्ण परिपाक रवीन्द्राच्या साहित्यांत झाला असल्यामुळें बंगाली साहित्याच्या दृष्टीनें रवीन्द्रांचें स्थान अत्यंत श्रेष्ठपणाचें ठरलें आहे.

## बंगालमधील तीन क्रान्त्या

रवीन्द्रनाथांचा जन्म झाला त्यावेळीं बंगालमध्यें तीन क्रान्त्या चालू झालेल्या होत्या. राजा राममोहन राय यांनीं धार्मिक आणि सामाजिक विचारांत सुरू केलेली क्रान्ति ब्राह्मोसमाजाच्या रूपानें वाढीस लागलेली होती. रवीन्द्रनाथांचे वडील देवेन्द्रनाथ हे त्या क्रान्तीचें स्वतःच्या आचरणानें त्यावेळीं नेतृत्व करीत होते. आपला भारत-देश इंग्रजांच्या दास्यांतून मुक्त करण्यासाठीं दुसरी क्रान्ति सुरू झालेली होती. योगी अरविन्दांचे मातामह राजनारायण बसु यांच्याकडे त्या क्रान्तीचें पौरोहित्य होतें. तिसरी क्रान्ति साहित्यक्षेत्रांत सुरू झालेली होती. कवि बिहारीलाल, बंकिमचंद्र आणि मायकेल मधुसूदन हे या क्रान्तीचे यशस्वी पुरस्कर्ते होते. रवीन्द्रांच्या बाळपणीं रवीन्द्रांच्या प्रतिभेवर या तीनहि क्रान्त्यांचे खोलवर परिणाम झालेले दिसून येतात.

## आध्यात्मिक बैठकीचें स्वरूप

ठाकुर घराणें हें कलकत्त्यांत आणि सर्व बंगालमध्यें अत्यंत पुढारलेलें होतें. रवीन्द्रनाथ हें देवेन्द्रांचे सर्वांत कनिष्ठ पुत्र. ठाकुर घराण्यांत विद्या, कला, देशभक्तीचे उद्योग, स्वदेशीचे प्रयोग, स्त्रीशिक्षण आणि इतर सामाजिक सुधारणा इत्यादि विविध प्रवृत्ती सतत चाललेल्या असत. सुधारक म्हणून सनातन्यांचा या घराण्यावर बहिष्कारच असल्यामुळें ठाकुर घराण्याचें जीवन सर्वप्रकारच्या संकुचित रूढींपासून पूर्णपणें मुक्त असें. कर्मठपणाला तेथें मुळींच वाव नव्हता. देवेन्द्रनाथ ठाकुर हे स्वतः कर्ते समाजसुधारक होते आणि हरतऱ्हेच्या शैक्षणिक कार्यांत सदैव निमग्न असत. तथापि त्यांच्या जीवनाची बैठक अध्यात्मावर उभी राहिलेली होती. उपनिषदांतील शुद्ध ब्रह्मविद्येची त्यांनीं जन्मभर निष्ठेनें उपासना चालविली.

“ ईशा वास्यं इदं सर्व यत् किंच जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथाः मा गृधः कस्यस्वित् धनम् ॥”

या प्रसिद्ध औपनिषद मंत्रानें त्यांना ब्रह्मविद्येचा मार्ग उघडा करून दाखविला होता. आणि बाळपणीं रवीन्द्रांना वडिलांकडून याच मंत्राच्या द्वारा उपनिषदांतील ब्रह्मविद्येची दीक्षा मिळाली होती. देवेन्द्रांच्या दीर्घ साधनेमुळें त्यांना ‘ महर्षि ’ ही पदवी लाभली होती. आणि महर्षींच्या प्रशान्त सान्निध्यांत रवींद्रनाथांच्या जीवनाचा स्वाभाविक विकास होत गेला. यामुळें रवीन्द्रनाथांच्या विभूतिमत्त्वाचा पाया उपनिषदांतील ब्रह्मविद्येनेंच घडविलेला आहे. जगताचें आदितत्त्व सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप असलें तरी तें मुख्यतः आनंदस्वरूप आहे आणि दृश्य विश्व हें त्या आनंदाचें आविष्करण आहे असा रवीन्द्रांना उपनिषदांपासून झालेला प्रधान साक्षात्कार आहे.

‘ आनन्दरूपम् अमृतम् यत् विभाति । ’ या








प्रसिद्ध उपनिषद्-वचनाचा ‘ हें सर्व दृश्य विश्व आनंदतत्त्वानें धारण केलेलें रूप आहे ’ असा रवीन्द्रनाथांनीं अर्थ केलेला आहे. त्यामुळें रवीन्द्रांचें अध्यात्म परंपरागत अध्यात्माप्रमाणें निष्क्रिय, परलोकपरायण, समाजविमुख झालें नाहीं. याच्या उलट, त्यांची जीवनदृष्टि केवळ जडवादी, विलासपरायण किंवा व्यक्तिनिष्ठहि बनली नाहीं. रवीन्द्रनाथांच्या आध्यात्मिक बैठकीचें हें स्वरूप चांगलें समजून घेतलें म्हणजे त्यांच्या सर्व जीवनाचा व साहित्यकलांचा अर्थ समजण्यास अडचण पडत नाहीं.

रवीन्द्रनाथांची प्रतिभा विविधरंगी आणि विश्वतोमुखी आहे. संत, साहित्यिक, कलावंत, तत्त्वज्ञ, शिक्षणसुधारक, विश्वशांतीचे उपासक – अशा विविध रूपांनीं त्यांचें जीवन समृद्ध झालेलें आहे. या सर्व शक्तींचा विकास त्यांच्या दीर्घ आयुष्यांत सतत होत राहिलेला दिसतो. वयाच्या पन्नाशीपर्यंत त्यांच्या कार्याचें क्षेत्र बंगाल-प्रान्तापुरतेंच मर्यादित राहिलेलें होतें. परंतु १९१३ मध्यें त्यांच्या ‘ गीतांजली’ला ‘ नोबेल प्राझिझ ’ नांवाचें प्रख्यात विश्वपारितोषिक मिळाल्यानंतर सार्‍या जगाचें लक्ष त्यांचेकडे धांवून गेलें. तेव्हांपासून त्यांच्या पार्थिव देहाला मृत्यु येईपर्यंत, म्हणजे सुमारें अडीच – तीन तपांचा काळ, त्यांची कामगिरी जागतिक क्षेत्रांत चालूं राहिली होती. त्यांचें ‘ शांतिनिकेतन ’ ही लहानशी शाळा राहिली नाहीं. तिला ‘ विश्वभारती’चें विशाल स्वरूप लाभलें. ‘ यत्र विश्वं भवति एकनीडम् । ’ या मुद्रावाक्यांत व्यक्त झालेल्या व्यापक संकल्पाला प्राणप्रतिष्ठा मिळाली. जगांतील सर्व राष्ट्रांनीं, सर्व विद्यापीठांनीं व सर्व साहित्यसंस्थांनीं रवींद्रनाथांना निमंत्रणें देऊन त्यांचा उत्साहानें सत्कार केला आणि त्यांचा मानवतेच्या ऐक्याचा व प्रेमाचा संदेश त्यांच्या तोंडून ऐकला. बंगालचे कवि आतां विश्वाचे कवि झाले आणि शांतिनिकेतनमधले गुरुदेव खरोखरींच जगद्गुरु बनले.

## विश्वमानवाचा आदर्श

रवीन्द्रनाथांच्या बालपणीं ज्या तीन क्रान्त्या चालू असल्याचें म्हटलें त्या तीनहि क्रान्त्यांत त्यांनीं पुढें स्वतः पुष्कळ कामगिरी केलेली आहे. राजा राममोहन राय यांनीं सुरू केलेल्या धर्मविचारांतील क्रान्तीला रवींद्रनाथांनीं आपल्या जीवनांत अत्यंत व्यापक स्वरूप दिलें. महर्षि देवेन्द्रनाथांनीं या क्रान्तीला उपनिषदांतील ब्रह्मविद्येचा खंबीर आधार मिळवून दिला आणि रवीन्द्रनाथांनीं त्याच ब्रह्मविद्येच्या आधारावर विशाल मानवधर्माची इमारत उठवून दिली. रवीन्द्रनाथांनीं ब्राह्मो-समाजाच्या प्रार्थनामंदिरांतून शेंकडों प्रवचनें दिलीं असलीं आणि ब्राम्हसंगीत म्हणून अनेक उपासनागीतें स्वतः रचून गायिलीं असलीं तरी ते ब्राह्मोसमाजाच्या सांप्रदायिक परिवेष्टनांत कधींच गुंतून पडले नाहींत. याबद्दल कट्टर ब्रह्मसमाजीयांना विषादच करावा लागला आहे. त्यांच्या प्रख्यात ‘ गोरा ’ कादंबरींत अशा संकुचित कट्टर सांप्रदायिकांची खूप थट्टा उडवलेली आहे. ‘ The Religion of Man ’ या त्यांच्या प्रख्यात ग्रंथांत त्यांनीं आपल्या ‘ मानवधर्मा’चें चांगलें विशदीकरण केलें आहे. रवीन्द्रांचा विश्वमानवाचा आदर्श आजच्या जगाला आनंदानें स्वीकारतां येण्यासारखा आहे.

## राजकीय कामगिरी

भारताच्या राजकीय मुक्ततेच्या कार्यांतहि रवीन्द्रनाथांनीं फार मोठी कामगिरी बजावलेली आहे. भारतमुक्ततेची दीक्षा सशस्त्र क्रान्तिकारकांच्या संगतींत रवीन्द्रनाथांना बालपणींच मिळाली होती. तथापि त्या मार्गाचा प्रत्यक्ष आचार त्यांचे हातून कधींच झाला नाहीं. याचें कारण भ्याडपणा नव्हे. रवीन्द्रनाथ हे अत्यंत निर्भय वृत्तीचे पुरुष होते. त्यांच्या जीवनांत विलासिताहि नव्हती. पण स्वातंत्र्याची त्यांची कल्पना पहिल्यापासूनच व्यापक होती. केवळ राजकीय फेरफारांनीं भारताचें दास्य दूर होऊं शकणार नाहीं अशी त्यांची विचारानें खात्री झालेली होती. भारताच्या मुक्तीसाठीं भारतीय लोकांचें मन आणि बुद्धि हीं पूर्ण निर्भय आणि स्वतंत्र झालीं पाहिजेत असा त्यांचा सिद्धान्त होता. हिंदुस्थानांत कॉंग्रेसच्या स्थापनेपासून जें अर्जविनंत्यांचें नेमस्त राजकारण चाललें होतें त्याचें रवीन्द्रनाथांना कधींच आकर्षण वाटलें नाहीं. पण वंगभंगाच्या तीव्र आघातानें त्यांच्या स्वाभिमानी वीरवृत्तीला जोराची चालना मिळाली आणि शांतिनिकेतनांतील आपल्या नव्या शैक्षणिक प्रयोगांतून बाहेर येऊन सामुदायिक आन्दोलनांत ते दाखल झाले. वंगभंगानंतरच्या विराट् चळवळींत ते अरविंदांच्या बरोबरीनें बंगालचें पुढारीपण करीत होते. यावेळीं त्यांनीं अत्यंत स्फूर्तिदायक गीतें रचिलीं आणि अनेक








प्रबंधांतून भारतीय समाजाच्या सर्वांगीण स्वातंत्र्याचा मार्ग शोधला. राजकीय दृष्ट्या अत्यंत तीव्र विचाराचे अनेक लेखहि या वेळीं त्यांनीं लिहिले. 'स्वदेशी समाज' नांवाच्या निबंधसंग्रहांत त्यांनीं भारतीय स्वातंत्र्यासंबंधीं प्रकट केलेली मीमांसा आजच्या स्वतंत्र भारताला पुष्कळच उद्बोधक ठरण्यासारखी आहे. बंगभंगाच्या चळवळींतून दहशतवादाची जी विकृति निर्माण झाली तिच्यामुळें ते प्रत्यक्ष चळवळींतून निवृत्त झाले. तथापि त्यांच्या साहित्यांतून राजकीय समस्यांचा ऊहापोह चाललाच होता. करबंदी, निःशस्त्र प्रतिकार, सत्याग्रह, यांचा पुरस्कार त्यांच्या कित्येक कादंबऱ्यांतून आणि नाटकांतून त्या काळीं केलेला आढळतो. आणि म्हणूनच महात्मा गांधींनीं प्रथम दक्षिण आफ्रिकेंत आणि नंतर हिंदुस्थानांत सत्याग्रहाचीं जीं अनेक आंदोलनें केलीं, त्यांत प्रत्येक वेळीं रवीन्द्रनाथांनीं गांधीजींची उत्साहानें साथ केलेली आढळते. यावरून राजकीय क्षेत्रांतील रवीन्द्रनाथांच्या कामगिरीचें स्वरूप स्पष्ट होण्यासारखें आहे. वंगभंग रद्द झाल्यानंतर १९११ च्या डिसेंबरांत कलकत्ता येथें भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत रवीन्द्रनाथांचें 'भारतविधाता' हें प्रभावी राष्ट्रीय गीत प्रथम गायिलें गेलें. आणि भारताला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर रवीन्द्रनाथांच्या त्याच गीताला अधिकृत राष्ट्रगीत म्हणून मान्यता लाभली. यांतच रवीन्द्रनाथांच्या राजकीय कामगिरीचा पुरेसा गौरव झाला असें मानतां येईल.

## 'संतांच्या लीलेंतून नीतीचा जन्म'

रवीन्द्रनाथांच्या बालपणीं साहित्यक्षेत्रांतहि एक मोठी क्रान्ति चाललेली होती असा उल्लेख यापूर्वी आला आहे. या क्रान्तीचा झेंडा रवीन्द्रनाथांनीं बंगाली साहित्यांत सर्वत्र अखंड नाचविला आणि आपल्या असामान्य प्रतिभासामर्थ्यानें वंग साहित्याला विश्वसाहित्यांत मोठ्या मानाचें स्थान मिळवून दिलें.

'निर्झरेर स्वप्नभंग' नांवाच्या अगदीं तरुणपणीं लिहिलेल्या कवितेंत :

'आमि ढालिबो करुणाधारा
आमि भांगिबो पाषाणकारा
आमि जगत् प्लाबिया बेडाबो गाहिया
आकुल पागल-पारा'

या शब्दांतून जें निर्झराचें मनोगत व्यक्त करण्यांत आलें आहे तें जणू कवि स्वतःचेंच मनोगत वर्णन करीत आहे असें दिसतें.

'एतो कथा आछे एतो गान आछे,
एतो प्राण आछे मोर'

हे शब्द तर त्यांच्या दीर्घ जीवनांतील सुदीर्घ साहित्य-सेवेला अक्षरशः लागू पडतात.

'जे दिन जगते चले आसि
कोन् मा आमारे दिलि शुधु
एइ खेलाबार बाँशि।'

या शब्दांत रवीन्द्रनाथ जगदंबेशीं प्रेमानें तक्रार करतात कीं 'मला तुझ्यापासून केवळ खेळण्यासाठीं बांसरीच मिळालेली आहे.' परंतु त्यांनीं आपलें व्यक्तिमत्त्व केवळ कल्पनेच्या रंगांत बुडवून ठेवलें नाहीं अथवा स्वतःच्याच सुखदुःखांत मग्न होऊं दिलें नाहीं. कारण 'जो माणूस स्वार्थमग्न होऊन बृहत् जगतापासून विमुख होतो तो कधीं वांचूं शकत नाहीं' याची अनुभूति त्यांनीं मिळविली होती. जीवनाच्या साक्षात्कारासाठीं सत्याचा ध्रुवतारा करून विश्वजीवनाच्या महान् सागरांत निर्भयपणें शिरावें लागतें, त्याच्या तरंगावर नाचत जाण्याची हिम्मत मिळवावी लागते, मृत्यूची भीति देखील जिंकावी लागते, हें रवीन्द्रनाथांना चांगलें उमजलें होतें. यामुळें 'संतांच्या लीलेंतून नीतीचा जन्म होतो' या ज्ञानेश्वरांच्या वचनाप्रमाणें रवीन्द्रनाथांच्या बांसरीनें केलेले खेळ विश्वाच्या कल्याणाला सदैव कारणीभूत होतील यांत अशय नाहीं.

## कालिदासाचें काव्य व ज्ञानेश्वरांचें अध्यात्म

रवीन्द्रांची प्रतिभा बहुरंगी होती. ते साहित्यादि कलांचे निर्माते होते पण त्याबरोबरच ते श्रेष्ठ प्रतीचे साहित्यसमालोचकहि होते. त्यांनीं प्राचीन संस्कृत काव्यें, प्राचीन व अर्वाचीन बंगाली साहित्य, यांचेविषयीं अत्यंत श्रेष्ठ प्रतीचे समालोचनात्मक लेख लिहिलेले आहेत. 'प्राचीन साहित्य', 'अधुनिक साहित्य' इत्यादि त्यांचे निबंधसंग्रह विद्वन्मान्य झालेले आहेत. साहित्याच्या तात्त्विक स्वरूपाविषयीं देखील त्यांनीं बंगालीमधून आणि इंग्रजीमधून पुष्कळ रहस्योद्ग्राही विवेचन केलें आहे. साहित्य अथवा कला यांचें प्रयोजन आनंद हेंच आहे असें त्यांचें मत आहे. 'Art for Art's sake' याच पंथाचा त्यांनीं पुरस्कार केला आहे. पण असें असूनहि त्यांच्या कलामूल्यांत जीवनाच्या श्रेष्ठ मूल्यांना वगळलेलें नाहीं. इतकेंच काय पण त्यांच्या दृष्टीनें साहित्य








हें मानवाच्या मुक्तीचें अत्यंत श्रेष्ठ साधन होऊं शकतें. उथळ बोधवादाची त्यांनीं खूप टर उडविली आहे. तथापि त्यांच्या साहित्याची तुलना आधुनिक वास्तववादी कलावंतांशीं होण्यासारखी नाहीं. त्यांचें साहित्य हें कोणत्याहि भाषेंतील श्रेष्ठ संतसाहित्याशीं तुलितां येण्यासारखें आहे. याचें कारण ललित आनंदाच्या प्राप्तीसाठीं देखील माणसाला आपल्या लोभमोहादि विकारांपासून मुक्त व्हावें लागतें, असा रवीन्द्रनाथांचा सिद्धान्त आहे. तथापि त्यांच्या साहित्यांत सामान्यतः संतसाहित्यांत आढळून येणाऱ्या सांकेतिक गोष्टी नाहींत. संसारनिंदा, वैराग्याचा एकसुरी उपदेश, असंभाव्य पौराणिक गोष्टी, ईश्वरी लीलेच्या असंबद्ध वर्णनें, नामस्मरणादि साधनांचा बेसुमार वडिवार, मूर्तिपूजेचे कंटाळवाणे प्रकार, निसर्गसौंदर्याविषयींची बेफिकिरी इत्यादि कोणतेच प्रकार रवीन्द्रसाहित्यांत, अगदीं त्यांच्या 'गीतांजली'तहि आपणांला आढळणार नाहींत. तरी देखील रवीन्द्रांचें काव्य हें साक्षात्कारी काव्य आहे याचा प्रत्यय आल्याशिवाय मात्र राहात नाहीं. रवीन्द्रांना निसर्गसौंदर्यांतून, बालकांच्या निर्हेतुक क्रीडांतून, प्रेमी जनांच्या परस्परप्रेमांतून, मानवांच्या सुखदुःखांतून, जीवनांतून आणि मरणांतूनहि ईश्वराच्या लीलेचें आनंददर्शन घडतें. त्यांची काव्यसाधना हीच त्यांची धर्मसाधना आहे. कालिदासाचें काव्य आणि ज्ञानेश्वरांचें अध्यात्म यांचा एकत्र संगम रवीन्द्रांच्या काव्यसंपत्तींत आढळून येतो. हें रवीन्द्रनाथांचें खास वैशिष्ट्य आहे असें माझें स्वतःचें मत आहे.

## 'कीर्तीपेक्षांहि मोठे'

रवीन्द्रनाथांमध्यें भारतीय संस्कृतीच्या सर्व मंगलगुणांचें मीलन झालेलें आढळतें. भारतीय संस्कृतीच्या अितिहासांत संसारविमुख वैराग्याची एक परंपरा प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. त्याचप्रमाणें विलासवादी कलावंतांचीहि दुसरी एक परंपरा तितकीच जुनी असलेली आढळते. रवीन्द्रनाथांमध्यें या दोनहि परंपरांतील सद्गुणांचा सुरेख समन्वय झालेला दिसून येतो. 'वैराग्यसाधने मुक्ति, से आमार नय।

असंख्य बंधन माझे महानंदमय

लभिबो मुक्तिर स्वाद।'

या त्यांच्या प्रसिद्ध घोषणेंत त्यांची सांस्कृतिक दृष्टि स्पष्टपणें व्यक्त झालेली आहे. रवीन्द्रनाथ हे स्वभावतःच सौंदर्योपासक आहेत. आणि त्यांनीं जीवनांतील अखिल वस्तूंमध्यें सौंदर्याचें दर्शन घेतलेलें आहे. त्यांनीं बंगालमध्यें प्रतिष्ठित घराण्यांतून नृत्य आणि नाट्य यांचेविषयीं स्त्रीपुरुषांना गोडी वाटेल असें संस्कारी वातावरण निर्माण केलें. विश्वभारतींतील विद्यार्थि-विद्यार्थिनी रवीन्द्रनाथांच्या अनेक नृत्यगीतांचे व नृत्यनाट्यांचे कार्यक्रम करून दाखवितात. त्यावेळीं अभिरुचीची उच्च पातळी यत्किंचित्‌हि न सोडतां शुद्ध कलेचा आविष्कार कसा करतां येण्यासारखा आहे याचें उत्तम निदर्शन पाहावयास मिळतें. रवीन्द्रनाथ हे स्वतः उत्तम नट होते. स्वतः लिहिलेल्या नाटकांतील अनेक भूमिका त्यांनीं अनेक वेळां करून दाखविलेल्या आहेत. कला म्हटली कीं थोडाबहुत सभ्यपणाला फांटा मिळालाच पाहिजे अशी पुष्कळांची समजूत असते. ही समजूत तत्त्वतः पूर्णपणें चुकीची आहे हें रवीन्द्रनाथांनीं आपल्या जीवनांत सिद्ध करून दाखविलें. हा त्यांनीं केलेला मोठाच कला-विक्रम होय असें समजलें पाहिजे. भारतीय कलावंतांपुढें रवीन्द्रनाथांनीं अत्यंत योग्य असा आदर्श उभा केलेला आहे.

रवीन्द्रनाथांचें व्यक्तिमत्त्व सर्वच क्षेत्रांत स्वतंत्रतेनें प्रकट झालेलें आहे. त्यांची वृत्ति इतकी असांप्रदायिक होती कीं त्यांनीं आपला स्वतःचा एकहि संप्रदाय निर्माण केला नाहीं. त्यांची प्रतिभा ही खरोखरीच नवनवोन्मेषशालिनी होती. यामुळें साहित्याचे नवे नवे प्रकार शोधून काढण्यांत ती सदैव गुंतलेली असे. गद्यलेखनाचे देखील त्यांनीं अनेक प्रयोग करून ठेवले आहेत. प्रतिभेच्या आविष्काराचीं त्यांचीं क्षेत्रेंहि सतत बदलत गेलीं आहेत. साहित्य, संगीत, नृत्य, नाट्य, चित्र इत्यादि विविध प्रकारांचा त्यांच्या प्रतिभेनें नवा नवा आश्रय शोधलेला आहे.

'तोमार कीर्तिर चेये तुमि जे महत्

ताअि तव जीवनेर रथ

पश्चाते फेलिया जाय कीर्तिरे तोमार वारंवार ॥' या ओळींत म्हटल्याप्रमाणें रवीन्द्रनाथ हे आपल्या कीर्तीहून मोठे होते. आणि म्हणूनच त्यांच्या जीवनाचा रथ त्यांच्या कीर्तीला वारंवार मागें टाकून पुढेंच धांवत गेलेला आहे. त्यांचें समृद्ध जीवन अनंतांत विलीन झालें असलें तरी त्यांनीं मागें ठेविलेलें अपार साहित्य त्यांच्या जीवनसमृद्धीचें दर्शन करून देण्याला आजहि समर्थ आहे. त्याच्या अध्ययनांतच यापुढेंहि आपणाला त्यांचें दर्शन होत राहील.










आंकडेवारीच्या अभ्यासावरून सुचलेले कांहीं निष्कर्षः श्री. श्या. म. जोशी

# भारताची गेल्या वर्षांतील आर्थिक प्रगतिः एक समालोचन

गेल्या चारसहा महिन्यांत, विशेषतः पं. नेहरू यांच्या चीनच्या दौऱ्यानंतर आपल्या देशाच्या आर्थिक प्रगतीच्या गतीबद्दल देशव्यापी चर्चा सुरूं झालेली दिसते. दुसरी पंचवार्षिक योजना आतां लौकरच मूर्त स्वरूपांत प्रकट होणार असल्यामुळें ही चर्चा निकडीची आहे यांत संशय नाहीं. तसेंच कांग्रेसच्या आवडी येथील अधिवेशनांत 'समाजवादी' आर्थिक धोरण मंजूर झाल्यामुळें देशांत आर्थिक प्रश्नांवर सर्व राजकीय पक्षांचें व जनतेचें लक्ष केंद्रित झालेलें दिसतें. अशा वातावरणांत आजच्या आर्थिक प्रश्नांचें स्वरूप समजून घेणें ही गोष्ट महत्त्वाची आहे. आजच्या आर्थिक प्रश्नांचा विचार करण्यासाठीं आर्थिक घडामोडींकडे नजर टाकल्यास लक्षांत येणारी प्रमुख गोष्ट अशी दिसते कीं एकूण आर्थिक घडामोडी फार गुंतागुंतीच्या व विवेचनाच्या दृष्टीनें सोप्या कोष्टकांत न सामावणाऱ्या अशा दिसतात. आजच्या जगांतील आर्थिक व्यवहार परस्परावलंबी असल्यामुळें, एका देशांतील आर्थिक घडामोडींचा विचार थोडासा एकांगी ठरण्याचा संभव आहे. भांडवलशाही अर्थरचनेचें केंद्रस्थान असलेल्या अमेरिकेंतील कांहीं अनपेक्षित आर्थिक घटनामुळें इंग्लंड व युरोपांतील राष्ट्रांच्या आर्थिक परिस्थितींत फरक पडणें शक्य आहे. हिंदुस्थानांत या घटनांचे पडसाद साहजिकच उमटतील. तेव्हां प्रचलित आर्थिक घडामोडींची चर्चा ठाम सिद्धांताच्या अनुषंगानें न करतां, विचारासाठीं मांडलेले कांहीं आडाखे अशा दृष्टीनें करणें उपयोगी ठरेल या कल्पनेनें येथें भारतांतील आजच्या आर्थिक प्रश्नांबद्दल कांहीं विचार मांडले आहेत.

## श्री. रणदिवे यांचें आर्थिक दुःस्थितीचें चित्र

भारतांतील आर्थिक परिस्थितीबद्दल सर्वसाधारणपणें दोन विरोधी विचार दिसतात. सामान्य मध्यमवर्गीय माणसाच्या दृष्टीनें आर्थिक परिस्थिति बिकट झालेली दिसते. वकीलांचा अनुभव असा आहे कीं कोर्टांतील कामासाठीं येणारे पक्षकार कमी झाले आहेत. डॉक्टर सांगतात कीं रोग्यांची संख्या रोडावलेली आहे. परदेशांतून उच्च शिक्षण घेऊन परत आलेल्या पदवीधरांनासुद्धां – मनासारखी मोठ्या पगाराची राहोच – पण घेतलेल्या शिक्षणाला साजेशी नोकरी मिळत नाहीं. शहरांतील बेकारांची वाढती संख्या एकूण आर्थिक दुःस्थितीचें चित्र दाखविते. तसेंच युद्धकाळांतील वस्तूंच्या चणचणीमुळें व परदेशांतून आयात होणाऱ्या वस्तूंची घट झाल्यामुळें साहजिक संरक्षण मिळालेले लहान धंदे आतां अडचणींत आहेत. छोटे कारखाने मागणीच्या अभावामुळें वा पैशाच्या अपुऱ्या संचयामुळें बंद पडूं लागले आहेत असा अनुभव आहे. याचा अर्थ देशावर एक मोठें आर्थिक अरिष्ट कोसळलें आहे असा करावयाचा का? – साम्यवादी विचारवंत श्री. बी. टी. रणदिवे यांच्या 'क्रायसिस् ऑफ इंडियन इकॉनमी' या पुस्तकांत आर्थिक अरिष्टांचा विचार मोठ्या आवेशानें मांडला आहे.

श्री. रणदिवे यांच्या पुस्तकाची पहिली आवृत्ति ऑगस्ट १९५३ मध्यें प्रसिद्ध झाली व सुधारून अद्ययावत् केलेली आवृत्ति मार्च १९५४ मध्यें प्रसिद्ध झालेली आहे. यावरून जशी पुस्तकाची लोकप्रियता सिद्ध होते तसेंच लेखकाचे विचार १९५४ मध्यें सुद्धां बदललेले नव्हते असा निष्कर्ष निघतो. श्री. रणदिवे यांनीं भारतांतील प्रमुख उद्योगधंद्यांचा – हातमाग, काथ्याच्या वस्तू, एंजिनिरिंग धंदे, चित्रपट, साखर, ज्यूट, कापड, चहा इत्यादींचा सविस्तर आढावा घेऊन असा विचार मांडला आहे कीं या सर्व धंद्यांवर एक मोठें अरिष्ट कोसळलें असून उत्पादनांत मोठी कपात झालेली आहे. धंद्यांचें उत्पादन हें बसविलेल्या यंत्रसामग्रीच्या मानानें तोकडें आहेच. शिवाय, युद्धकाळापूर्वीच्या उत्पादनापेक्षां सुद्धां उत्पादन अनेक उद्योगधंद्यांच्या बाबतींत कमी आहे. याचा परिणाम म्हणून कामगारवर्गाची परिस्थिति खडतर होत आहे आणि बेकारांची संख्या








फुगत आहे. या सर्व अरिष्टाचें मूळ श्री. रणदिवे यांच्या मताप्रमाणें हिंदी अर्थकारणावरील ब्रिटिश व आतां पुढें सरसावणाऱ्या अमेरिकन मक्तेदार भांडवलशाहीच्या वाढत्या मगरमिठींत आहे. शेती-विभागांतील आर्थिक गंडांतर जमीनदारी शोषणामुळें निर्माण झालें आहे.

श्री. रणदिवे यांनीं मांडलेल्या आंकड्याप्रमाणें व सिद्धांताप्रमाणें उद्योगधंद्यांच्या परिस्थितींत १९५४ मध्यें अधिक बिघाड व्हावयास हवा होता. पण प्रसिद्ध झालेल्या आंकडेवारीवरून तरी उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें १९५४ हें वर्ष भरभराटीचें गेलेलें दिसतें. श्री. रणदिवे यांच्या आर्थिक चर्चेचा महत्त्वाचा पाया एका राजकीय सिद्धांतावर–ब्रिटिश साम्राज्यशाही व हिंदी सरकार यांतील संबंधावर–आधारलेला असून त्या सिद्धांताच्या पाठपुराव्यासाठीं ते आर्थिक आराखडा मांडतात असें दिसतें. या विवेचनाचा कच्चेपणा असा दिसतो कीं त्यांनीं वर्णन केलेली परिस्थिति एका विशिष्ट काळापुरती खरी ठरली तरी त्यापासून परिस्थितीचें यथार्थ ज्ञान होण्यास मदत होत नाहीं.

## भारतीय अर्थरचनेवर ताबा कोणाचा ?

आपल्या देशांतील प्रत्येक उद्योगधंद्यावरील संकट म्हणजे ब्रिटिश मक्तेदार भांडवलशाहीनें रचलेला डाव असा अर्थ विवेचनाच्या सोयीसाठीं सोपा असला तरी परिस्थितींत थोडीशी सुधारणा झाल्यास त्यासाठीं नवें राजकीय कोष्टक मांडावें लागतें. शिवाय, श्री. रणदिवे यांच्या दृष्टिकोनाप्रमाणें हिंदी उद्योगधंद्यांच्या परिस्थितीवर देशांतील उद्योगधंद्यांच्या चालकांच्या हिकमतीचा व उलाढालीचा झालेला व होणारा परिणाम दुय्यम दर्जाचा ठरतो. श्री. रणदिवे यांच्या विचाराच्या मागें आपल्या देशांतील परदेशी–विशेषतः इंग्रजी भांडवलाच्या स्थानाबद्दल एक प्रमेय गृहीत धरलेलें आहे आणि तें म्हणजे आपल्या आर्थिक जीवनाच्या फार मोठ्या क्षेत्रावर इंग्रजी भांडवलाचें वर्चस्व आहे. श्री. रणदिवे यांच्या आपल्या देशांतील इंग्रजी भांडवलाच्या स्थानाबद्दलच्या कल्पना अवास्तव आहेत. हिंदुस्थानांतील उद्योगधंद्यांत, व्यापारांत बरेंच मोठें इंग्रजी भांडवल गुंतलेलें असून इंग्रजी बँका, विमा कंपन्या परदेशी व्यापारावर त्यांच्या मक्तेदारीमुळें दडपण आणतात ही गोष्ट खरी आहे. पण याचा अर्थ हिंदुस्थानच्या सगळ्याच आर्थिक नाड्या ब्रिटिश मक्तेदारांच्या हातीं असून देशांतील भांडवलदारांचें स्वतंत्र असें धोरण असूं शकणार नाहीं असा लावणें धाडसाचें ठरणार आहे. ज्यूट, चहाचे मळे, काड्याच्या पेट्या इत्यादि कांहीं धंदे सोडल्यास कोणत्याहि हिंदी उद्योगधंद्यांत इंग्रजी भांडवलाचा वरचष्मा नाहीं. देशांतील अंतर्गत बँकांचे व्यवहार व विमा हिंदी भांडवलदारांच्या हातीं आहे. अशा परिस्थितींत इंग्रजी भांडवल व हिंदी भांडवल यांच्या परस्परबलाबद्दल ठाम निर्णय घेणें कठीण आहे. आणि श्री. रणदिवे मांडतात तसा इंग्रजी भांडवलाचा हिंदी अर्थरचनेवर सर्वंकष ताबा नाहीं. आपला मक्तेदार भांडवलदार वर्ग स्वतंत्र असून देशाच्या आर्थिक यंत्रांवर त्याचा चांगला अंमल आहे. परदेशी भांडवलाविरुद्ध त्यांच्या जशा तक्रारी आहेत तसेंच त्यांचे व इंग्रजी भांडवलाचे महत्त्वपूर्ण असे भागीदाराचे संबंधहि आहेत. म्हणून भांडवलदारांनीं परदेशी भांडवलदाराविरुद्ध मांडलेल्या तक्रारींचा विचार खोलवर केला पाहिजे. हिंदी भांडवलदार व इंग्रजी भांडवल यांचे संबंध गुंतागुंतीचे असून या घटना सुलभ समीकरणांत सामावणाऱ्या नाहींत. म्हणून इंग्रजी मक्तेदार भांडवलशाहीनें निर्माण केलेलें अरिष्ट एवढें सोपें सुटसुटीत वर्णन करून आपल्या आर्थिक प्रश्नांचा उलगडा होत नाहीं. १९५४ मध्यें देशांतील उद्योगधंद्यांच्या भरभराटीवरून, श्री. रणदिवे यांची ही मीमांसा फारशी उपयोगी ठरत नाहीं. आंध्रमधील कॉंग्रेस-संयुक्त आघाडीच्या यशाचें कारण म्हणून देशांतील शेती व औद्योगिक उत्पादनांत झालेली वाढ असा एक युक्तिवाद कम्युनिस्ट पक्षानेंच केलेला आहे.

## उद्योगधंद्यांतील लहान घटक व मध्यम वर्गांतील बेकारी

श्री. रणदिवे यांच्या निष्कर्षाशीं आपला अनुभव जुळतो असें सांगणारा एक महत्त्वाचा गट म्हणजे छोट्या उद्योगधंद्यांचा व व्यापाऱ्यांचा. लहान कारखानदारीची आज परिस्थिति बिकट आहे यांत शंका नाहीं. महाराष्ट्रांतील बरेचसे उद्योगधंदे वैयक्तिक कर्तृत्वावर चालविलेले स्वतंत्र धंदे आहेत. या धंद्यांच्या मागें पैशाचा मोठा संचय अगर अनेक हिकमती करणारे सूत्रधार नाहींत. या छोट्या कारखान्यांचा अनुभव असा दिसतो कीं बाजारांत भरपूर माल येऊं लागल्या-










मुळें वाढत्या चढाओढींच्या दिवसांत धंदा चालविणें कठीण होत आहे. बाजारांतील किंमतींतील चढउतारामुळें पैशाचा संचय नसलेल्या संस्थेस अधिक संघटित अशा मोठ्यांशीं स्पर्धा करणें अवघड असतें. शिवाय युद्धकाळांत हातीं आलेला बराच पैसा छोट्या कारखान्यांनीं अवास्तव भांडवली खर्चांत ( यंत्रसामग्री-इमारती अशा प्रकारच्या साधनांसाठीं ) वापरल्यामुळें आतां साहजिकच चालू भांडवलाची चणचण आहे. या सर्व अडचणींमुळें छोटे कारखानदार हवालदील झालेले दिसतात. आजच्या आर्थिक रचनेंत लहान घटकांना मुळांतच वाव थोडा आणि तशांत चढाओढीचा बाजार म्हणून त्यांची आर्थिक परिस्थिति बिकट होणें हें क्रमप्राप्त दिसतें. या घटकांचा लहानपणा त्यांच्या संकटाचें मूळ आहे.

मध्यमवर्गांतील वाढती बेकारी ही एकच गोष्ट आर्थिक संकटाची सूचना देण्यास पुरेशी आहे असें सामान्यतः म्हटलें जातें. प्रसिद्ध झालेल्या सरकारी अहवालावरून शहरांतील सुशिक्षित वर्गांपैकीं शें १०. इतके लोक आज बेकार आहेत. या सुशिक्षित बेकारांत पदवीधर व शालान्त परीक्षा दिलेले लोक यांची संख्या मोठी आहे. सरकारी केंद्रांत नोकरीसाठीं दाखल होणाऱ्या अर्जांच्या आंकड्यावरून वाढत्या बेकारीची कल्पना येते. प्रश्न एवढाच आहे कीं वाढती बेकारी हा आर्थिक अरिष्टाचा एक भाग आहे असें मानावयाचें का ? विचारांत घेण्यासारखी महत्त्वाची गोष्ट म्हणजे एकंदर भांडवलशाही अर्थरचनेच्या दृष्टीनें वाढती बेकारी व छोट्या उद्योगधंद्यांची खडतर परिस्थिति ह्या गोष्टी अरिष्ट म्हणून मानावयाच्या का ? बेकारीमुळें मध्यमवर्गाची व कामगारांची परिस्थिति खडतर झाली तरी एकंदर अर्थव्यवस्थेच्या दृष्टीनें या घटनेचे कांहीं फायदे पण संभवतात, हें लक्षांत घेणें जरूर आहे.

मंदीचा काळ भांडवलशाही अर्थरचनेच्या चौकटींत स्वागतार्ह ठरण्याची परिस्थिति असते. कारण तेजी-मंदीच्या चक्रांतून क्रमशः जाणाऱ्या अर्थव्यवस्थेच्या अंतर्गत रचनेच्या दृष्टीनें, वाढत्या बेकारीमुळें कामगारांना वठणीवर आणून मजूरीच्या दरांत कपात करतां येते व लहान म्हणून अकार्यक्षम असणाऱ्या छोट्या घटकांना हुसकावून लावतां येतें. मात्र या मंदीच्या तडाख्यामुळें जनतेनें अशी चढ-उतरणीची अर्थरचना बदलण्याचीच तयारी केली असेल तर प्रश्न निराळा. पण लोकशाही शक्ति प्रबळ नसेल, तर राज्यसंस्थेला नुसत्या बेकारीला व लहान धंद्यांच्या नाशाला घाबरण्याचें कारण उरत नाहीं. आपल्या देशांतील मोठ्या खाजगी उद्योगधंद्यांच्या मालकांना वाढत्या बेकारीचें कारण म्हणून सरकारी धोरणाकडे बोट दाखवितां येतें. आपल्या भांडवली अर्थव्यवस्थेचें स्वरूपच खुरटें असल्यामुळें थोडें उत्पादन करून नफा वाढविण्याकडे सर्वसाधारण कल आहे. आणि अशा व्यवस्थेंत बरीच यंत्रसामग्री निकामी पडून थोड्या उत्पादनावर अधिक नफा सुटत असेल तर त्या मार्गाचा अवलंब केला जातो. साखर-कारखान्यांचें धोरण या दृष्टीनें उल्लेखनीय आहे. १९५२ मध्यें उत्पादनांत झालेल्या वाढीमुळें साखरेच्या किंमती घसरल्या होत्या. त्या अनुभवावरून पुढील दोन्ही हंगामांत साखरेचें उत्पादन कमी झालें व किंमती मात्र चढल्या.

या विवेचनाचा उद्देश असा आहे कीं. १९५४ मध्यें औद्योगिक उत्पादनांत झालेली वाढ छोट्या कारखानदारीच्या अनुभवाशीं व वाढत्या बेकारीशीं विसंगत असली तरी सत्य आहे ही गोष्ट स्पष्ट व्हावी. सरकारी आंकडेवारीवरून व मोठ्या उद्योगधंद्यांतील घटकांच्या प्रसिद्ध झालेल्या ताळेबंदांवरून गेलें वर्ष उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें भरभराटीचें गेलें असें म्हणावें लागतें.

## औद्योगिक उत्पादनांत वाढ

औद्योगिक क्षेत्रांतील प्रगति दाखविणारें महत्त्वाचें गमक म्हणजे १९५४ मध्यें बहुतेक सर्व धंद्यांच्या उत्पादनांत झालेली वाढ. मुंबईच्या ' कामर्स ' साप्ताहिकाच्या वार्षिक अंकांत प्रसिद्ध झालेल्या आंकडेवारीवरून उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें गेलें वर्ष स्वातंत्र्याच्या काळांत सर्वांत अधिक भरभराटीचें गेलें असें दिसतें. १९४६ शीं तुलना करतां उद्योगधंद्यांचा उत्पादनांक सप्टेंबर १९५४ मध्यें सर्वांत अधिक होता. खालील तुलनात्मक आंकडे ही गोष्ट स्पष्ट करतात.

औद्योगिक-उत्पादन-दर्शकांक ( वार्षिक सरासरी )

| वर्ष | १९४६=१०० |
|---|---|
| १९५० | १०५·० |
| १९५१ | ११७·२ |
| १९५२ | १२८·९ |








| | | |
|---|---|---|
| | १९५३ | १३५.३ |
| जुलै | १९५४ | १४९.८ |
| सप्टेंबर | ,, | १५२.० |

सप्टेंबर १९५४ मध्यें औद्योगिक उत्पादनांक १९५३ मधील सरासरीपेक्षां १२.६% नी अधिक होता. १९५४ मध्यें औद्योगिक उत्पादनांत वाढ झालेली आहे ही गोष्ट खालील आंकडेवारीवरून सिद्ध होते.[१]

औद्योगिक क्षेत्रांतील भरभराटीचें दुसरें गमक म्हणजे १९५४ मध्यें उद्योगधंद्यास लागणाऱ्या कच्चया मालाच्या किंमतींत जरी उतार झालेला दिसतो तरी पक्कया मालाच्या किंमतींत थोडी वाढच झालेली दिसते. याचा अर्थ असा दिसतो कीं औद्योगिक वस्तूंस मागणी चांगली होती व त्यामुळें कारखानदारी अधिक किफायतशीर होती. किंमतीच्या दर्शकांकावरून असें दिसतें कीं १९४६ च्या किंमतीवर आधारलेला कच्चया मालाच्यां किंमतीचा दर्शकांक ३० जानेवारी १९५४ ला ४८६.५ होता; तर २९ जानेवारी ५५ रोजीं तो दर्शकांक ४२७.८ होता. म्हणजे तो ८% इतका उतरला. याच मुदतींत पक्कया मालाच्या किंमतींचा दर्शकांक ३६४.९ पासून ३७६.५ इतका म्हणजे ३.३% वर गेला.

ठोक किंमतीचा दर्शकांक ( वार्षिक सरासरी )
( ऑगस्ट १९३९ = १०० )

| | १९५३ | १९५४ |
|---|---|---|
| औद्योगिक कच्चा माल | ४५९.७ | ४४७.१ |
| औद्योगिक वस्तू | ३६७.० | ३७५.४ |

कच्चा माल स्वस्त होऊन जर पक्कया मालाच्या किंमती वाढल्या तर साहजिकच धंद्याची परिस्थिति सुधारली असें म्हणतां येईल. प्रसिद्ध झालेल्या मोठ्या कंपन्यांच्या ताळेबंदावरून केलेलें हें अनुमान वाजवी दिसतें.

## बँका, रेल्वे व शेअरबाजार

उद्योगधंद्यांस लागणारें चालू भांडवल बँका पुरवतात. बँकांनीं उद्योगधंद्यांना अगर व्यापाराला दिलेल्या कर्जावरून धंद्याच्या परिस्थितीचा अंदाज करणें शक्य आहे. नोव्हेंबर १९५३ शीं तुलना करतां १९५४ मध्यें संलग्न बँकांनीं दिलेल्या कर्जांत रु. ४५ कोटी इतकी वाढ झालेली दिसते. १९५४ मध्यें औद्योगिक परिस्थिति चांगली असल्यामुळें बँकांच्या नफ्यांत वाढ झाली आहे. ' बँक ऑफ बडोदा ' व ' युनायटेट कमर्शिअल बँक ' यांचा १९५४ मधील नफा त्यांच्या १९५३ मधील नफ्यापेक्षां २५% अधिक आहे तर पंजाब नॅशनल बँकेचा गेल्या वर्षाचा नफा ३०% जास्त आहे. अर्थात् निरनिराळ्या बँकांच्या बाबतींत नफ्याच्या प्रमाणांत कमी-अधिक फरक आहे. पण सर्वसाधारणपणें देशांतील सर्व बड्या बँकांना १९५४ हें वर्ष चांगलें गेलें आहे. ( ' टाईम्स ऑफ इंडिया– ' व्यापारी बातम्या. २४।१।५५ )

रेल्वे बोर्डानें प्रसिद्ध केलेल्या मालवाहतुकीच्या आंकडेवारीवरून सुद्धां उद्योगधंद्यांच्या परिस्थितीची कल्पना येण्यास मदत होते. प्रसिद्ध झालेल्या माहिती-

---

१ वर दाखविलेली सर्व उद्योगधंद्यांची सरासरी आहे. स्वतंत्रपणें प्रत्येक धंद्यांतील परिस्थितीकडे नजर टाकल्यास साखर काड्याच्या पेट्या हे धंदे अपवादात्मक असून या धंद्यांच्या बाबतींत मात्र उत्पादनांत घट झालेली दिसते. इतर सर्व धंद्यांच्या बाबतींत उत्पादनांत १९५४ मध्यें झालेली वाढ खालील आंकड्यावरून दिसून येतें.

| | १९५२ | १९५३ | १९५४ |
|---|---|---|---|
| कापड ( दहालक्ष वार ) | ४५९८ | ४८७८ | ४९५० |
| ज्यूट ( हजार टन ) | ९५२ | ८६९ | ९४९ |
| सिमेंट ( लक्ष टन ) | ३५.३८ | ३७.८० | ४३.५७ |
| सायकली ( लक्ष ) | १.९६ | २.६४ | ३.३८ |
| कंदील ( हजार ) | ३५२३ | ४३१३ | ६०९६ |
| शिवण्याचीं यंत्रें ( हजार ) | ५० | ६२ | ८० |
| डिझल एंजिन्स ( संख्या ) | ४२४८ | ३७२० | ८१०० |

ही आंकडेवारी अशीच वाढवितां येईल. १९५४ चे आंकडे थोडे अपुरे असण्याचा संभव आहे. ( हे आंकडे ' टाइम्स ऑफ इंडिया'च्या गेल्या प्रजासत्ताकदिनपुरवणीवरून घेतले आहेत. )








प्रमाणें १९५४ मध्यें देशांतील लोहमार्गांनें फाळणी-नंतरच्या काळांत माल-वाहतूकीचा उच्चांक गांठला आहे. १–४–५४ ते ३०–११–५४ या मुदतींत रेल्वेचें माल-वाहतुकीचें उत्पन्न गेल्यावर्षांच्या याच मुदतींतल्या पेक्षां रु. २·६८ कोटी एवढ्या रकमेनें वाढलें आहे. ('टाईम्स ऑफ इंडिया' ६।१।५५ ). रेल्वेच्या अंदाज-पत्रकांत सुद्धां माल-वाहतुकीचें १९५५–५६ चें उत्पन्न अंदाजापेक्षां रु. ७·९० कोटींचें अधिक धरलें आहे.

देशांतील औद्योगिक परिस्थितीचें निदर्शक म्हणून शेअर बाजारांतील घडामोडींचा उल्लेख करणें जरूरीचें आहे. १९५४ मध्यें मुंबई, कलकत्ता व मद्रास या तिन्ही महत्त्वाच्या शेअर बाजारांतील व्यवहार तेजीचे होते. मुंबई-बाजारांत तर १९५१–५२ मध्यें ज्या शेअर्स-च्या भावांत मोठी घसरगुंडी झाली होती, त्या शेअर्सनीं १९५४ मध्यें ही खोट भरून काढली. कलकत्त्याच्या बाजाराच्या वार्षिक अहवाला-वरून सुद्धां व्यापाराची परिस्थिति तेजीची होती असें दिसतें. व्यवहाराच्या आंकडेवारीप्रमाणें ६२% इतक्या व्यवहार-सभा तेजीचा होत्या. आणि मद्रास बाजारांचा तर १९५४ म्हणजे स्वातन्त्र्यानंतरचें सर्वांत उत्तम वर्ष असा अभिप्राय आहे. शेअर बाजारांतील तेजीच्या उलाढाली म्हणजे औद्योगिक प्रगतीवरील विश्वासाचें गमक समजण्यांत येतें. या दृष्टीनें उद्योगधंद्यांच्या शेअर्सच्या किंमती १९५४ मध्यें मजबूत होत्या.[२] याचा अर्थ उद्योधंद्यांचें भविष्य उज्ज्वल आहे असाच होतो.

पं. नेहरूंच्या 'समाजवादी' धोरणाचेंसुद्धां शेअर बाजारांत उत्साहानें स्वागत झालें ही गोष्ट महत्त्वाची आहे. २३ जानेवारी १९५५ च्या 'टाईम्स्स ऑफ इंडिया' मधील शेअर बाजाराच्या साप्ताहिक अहवालाची सुरवातच " प्रधान मंत्र्यांच्या औद्योगिक धोरणाच्या स्पष्टीकरणामुळें मुंबई शेअर-बाजारांत कांहीं दिवसांच्या नरमाई नंतर उत्साहाचें वातावरण निर्माण झालें" अशा शब्दांत केली आहे. यावरून देशाच्या औद्योगिक प्रगतीबद्दल वाढता विश्वास दिसत आहे ही गोष्ट स्पष्ट होते.

## छोट्या घटकांचें दुबळेंपण

वरील आंकडेवारीवरून आपल्याला असें म्हणतां येईल कीं वाढतें उत्पादन, औद्योगिक मालाच्या स्थिर किंमती, बँकांनीं दिलेलीं कर्जे व बँकांनीं मिळविलेले वाढते नफे, मालवाहतुकीचा उच्चांक व शेअर-बाजारां-तील तेजी या सर्व गोष्टी औद्योगिक भरभराट दाख-विण्यास पुरेशा आहेत. याचा अर्थ असा नव्हे कीं उद्योग-धंद्यांतील प्रत्येक घटकास सुस्थितीचा अनुभव आला असेल. परिस्थिति वास्तविक उलट आहे. लहानलहान घटकांच्या कार्यक्षेत्राचा संकोच झालेला दिसतो व त्या घटकांच्या कमीजास्ती अकार्यक्षमतेमुळें बाजार-पेठेपैकीं लहान घटकांचा भाग मोठ्या संस्थांनीं काबीज केला. उदाहरण म्हणून असें देतां येईल कीं १९५३-५४ मध्यें एकाच धंद्यांतील एका मोठ्या घटकाचा व दुसऱ्या लहान घटकाचा अनुभव असा दिसतो कीं या वर्षांत बड्या घटकाची विक्री २७% वाढली तर छोट्या घटकाची २२% कमी झाली.

विक्रीचे आंकडे ( लक्ष रु. )

| | १९५२।५३ | १९५३।५४ |
|---|---|---|
| अ – ( बडा घटक ) | ९७·९५ | १२४·१६ |
| ब – ( लहान घटक ) | ११·३१ | ८·७९ |

महाराष्ट्रांतील बरेचसे उद्योगधंदे लहान प्रमाणावर

औद्योगिक शेअरच्या किंमतीचा दर्शकांक

१९४९–५० = १००

( तारीख संपणाऱ्या आठवड्याची )

| | २६-१०-५२ | २१-११-५३ | २०-११-५४ |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण उद्योगधंदे | ९२.७ | ९९.३ | ११९.९ |
| १. कापड–लोंकर रेशीम | ९१.५ | ९५.७ | १०९.७ |
| २. ज्यूट | ७८.७ | ८५.३ | ९५.३ |
| ३. पोलाद-लोखंड | ९७.३ | १०८.२ | १४३.१ |
| ४. साखर | ८४.६ | ११५.६ | १५८.४ |








असल्यामुळें आपल्याकडील उद्योगधंद्यांचा अनुभव एकंदर देशांतील अनुभवाशीं विसंगत आहे. दोन महिन्यांपूर्वी मुंबईच्या 'लोकमान्य' या वर्तमानपत्रांत या विषयावर एक संपादकीय लेखमाला प्रसिद्ध झाली असून महाराष्ट्रांतील छोट्या एंजिनिअरिंग धंद्यांची परिस्थिति कशी खडतर झाली आहे, त्याचें सविस्तर वर्णन तेथें दिलें होतें. त्यांत उपाययोजना पण सुचविली आहे. छोट्या उद्योगधंद्यांची बिकट परिस्थिति ही एकंदर मंदीचा भाग आहे कीं छोट्या घटकांच्या अंतर्गत दुबळेपणाचा तो परिणाम आहे हा प्रश्न या संदर्भांत विचारांत घेणें जरूर आहे.

या विवेचनाचा उद्देश एवढाच आहे कीं केवळ मध्यमवर्गाचा व लहान उद्योगधंद्यांचा अनुभव अगर साम्यवादी विचारवंतांनीं मांडलेलें राजकीय कोष्टक—या सोप्या गमकांवरून आपल्या आर्थिक प्रश्नाचा संपूर्ण विचार होऊं नये. आपल्या देशांतील अर्थव्यवस्थेच्या नाड्या हातीं असलेल्या बड्या भांडवलदारांच्या कार्यपद्धतीची बारकाईनें चौकशी करणें जरूर आहे.

भरभराटीची दिसणारी परिस्थिति अशीच राहील किंवा आर्थिक गंडांतर येईल हा प्रश्न स्वतंत्र चर्चेचा आहे. पण देशांतील काँग्रेसमधील अगर बाहेरील लोकशाही शक्तींची वाढ होईपर्यंत परिस्थितींत फारसा बदल होण्याचें कारण नाहीं. सरकारी खर्चाचा ओघ मोठ्या प्रमाणांत चालू राहणार असल्यामुळें बाजारपेठा ओसरण्याचें कारण नाहीं. छोट्या धंद्यांचा संकोच होईल यांत संशय नाहीं. पण तो प्रश्न भांडवलशाही रचनेच्या व्यवस्थेचा आहे. मध्यमवर्गीय बेकारीचें कारण म्हणून खाजगी उद्योगधंद्यांतून सरकारी हस्तक्षेप असा प्रचार करणें मोठ्या उद्योगधंद्यांना शक्य आहे. आपल्या देशांतील बडा भांडवलदारवर्ग बलिष्ठ असून राज्ययंत्रावरील त्याची पकड घट्ट आहे. अशा परिस्थितींत आर्थिक अरिष्टाचा विचार दूरचा वाटतो. अर्थात् राजकीय परिस्थितींत मोठा बदल झाल्यास त्याचा अर्थव्यवस्थेवर परिणाम होईल यांत संशय नाहीं.

---

## जीवन हो डोहापरि !

आज न तें भरलेंपण
श्रावणिंच्या मेघाचें
बुद्धाच्या हृदयाचें
राहुनि जें शब्दहीन
रचितें काव्यें महान्

आज न तें सरलेंपण
घेउनि जें रिक्त करीं
मी निचिन्त तिष्ठावें
कुणि वळतां करुणाघन
क्षणिं जावें भरभरून !

आज रितेंपणिं उरलें
भरलेंपण सांखळलें
जीवन हो डोहापरि
कमलाविण — लहरीविण
भरलेलें — निश्चेतन !

— सरिता पदकी

## आज अचानक— !

आज अचानक स्वप्न उकललें
होते अधुरें – धुंधुक – चंचल
तव गीताची लकेर एकच
येतां लहरत मधुमय मंगल

भयाण उघडा हा गाभारा
शून्य तमावृत मानस-मंदिर
उजलुन जाई तव हास्याच्या
नंदादीपें सारे स्थिर-चर

युगा-युगाचें हें शोकांकित
विपाक्त नीरस माझें जीवन
नकळे झालें निमिषार्धांतच
तव चरणाच्या स्पर्शें पावन

अंजलींत मम सुकलीं कमलें
अतांच तव पदिं देतों वाहुन
अतांच घेतों अभंग गाउन
भंगुन गेल्या एकतारिंतुन

आज अचानक आलिस जेवीं
ज्ञात देवते ! जाशिल येथुन !
शून्य उपेक्षित मग हें अंतर
राहि अपेक्षित तुला चिरंतन ।

— जगन्नाथ टंकसाळी







डा. ग. वा. तगारे

# बहुजनसमाजाचें भाषिक धन

प्रस्तुत लेख भाषाशास्त्र व शिक्षणशास्त्र यांच्या भूमिकेवरून मुख्यतः लिहिलेला आहे. लेखकाची समजूत अशी आहे कीं प्रौढ-मतदान-पद्धतीवर आधारलेली आपली लोकशाही नीट चालण्यासाठीं शिक्षणाचा प्रसार अत्यंत त्वरेनें व्हावयास पाहिजे. शाळेंत जाण्याचें वय असणाऱ्या मुलांसाठीं सक्तीचें प्राथमिक शिक्षण, आणि शाळेंत जाण्याचें वय नसणाऱ्या प्रौढांसाठीं समाज-शिक्षण यांवर सध्यां सरकार जो अमाप पैसा खर्च करीत आहे तो अधिक सत्कारणीं लागून जास्तींत जास्त लोकांना शिक्षणाचा टिकाऊ स्वरूपाचा लाभ व्हावा यासाठीं बहुजन-समाजाच्या भाषेचा लेखभाषेंत अधिकाधिक उपयोग करून, भिन्न-भिन्न वयोगटांच्या मानसशास्त्रीय वाढीला अनुलक्षून लिहिलेलें वाङ्मय जास्त प्रमाणावर निर्माण झालें पाहिजे, असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. वाङ्मयनिर्मिति करूं शकणाऱ्या साहित्यिक, संपादक, शिक्षक, प्राध्यापक, सामाजिक कार्यकर्ते यांसाठींहि हा लेख आहे. बौद्धिक नेतृत्व करणाऱ्या लोकांत डॉ. अंबेडकरांपासून तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोश्यांपर्यंत समाजाच्या भिन्नभिन्न थरांतील कार्यकर्ते येत असल्यामुळें हा लेख केवळ पुढारलेल्या वर्गासाठीं मानणें योग्य होणार नाहीं.

समाजांत निर्माण होणारे उत्तमोत्तम विचार बहुजनसमाजापर्यंत पोंचले पाहिजेत, इतकेच नव्हें तर समाजांतील प्रत्येक व्यक्तीचा तो हक्क आहे ही जाणीव प्राचीन भारतीय परंपरेंत जागृत होती. ' सर्व धर्मांना सोडून मला शरण ये, मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन ' अशी ग्वाही देणाऱ्या श्रीकृष्णाला ' स्त्रिया , वैश्य व शूद्र यांना परा गतीस ' नेणारें तत्त्वज्ञान बहुजनसमाजाच्या– वाणी, उदमी, शेतकरी, कष्टकरी समाजाला समजणाऱ्या भाषेंत बोलणें भाग होतें. जैन धर्माचे शेवटचे तीर्थंकर वर्धमान महावीर ' देवांना देव-भाषेंत, माणसांना मानवी भाषेंत व शबरांना शाबरी भाषेंत ' उपदेश करीत. मृत्युशय्येवर पडलेल्या गौतमबुद्धानें आपली शिकवण संस्कृत भाषेंत ग्रथित करण्याच्या सूचनेचा प्रतिषेध करून, ' प्रत्येकाला आपापल्या भाषेंत ' आपला उपदेश कळला पाहिजे अशी इच्छा व्यक्त केली. गौतमबुद्धानंतर सुमारें १९०० वर्षांनीं महाराष्ट्रांत महानुभावपंथाच्या पुरस्कर्त्या केशवराजसूरींनीं चक्रधराची शिकवण संस्कृतमध्यें मांडण्याची इच्छा व्यक्त केली असतां, त्या पंथाचे पुढारी पंडित नागदेवाचार्य यांनीं कळवळून सांगितलें :

' नको गा केशवदेया, येणें माझिये स्वामीचा सामान्य परिवारु नागवेल कीं ! '

गीता-भागवतांचा संदेश आबालवृद्धांपर्यंत पोंचवणें हें वारकरी संतांचें जीवनकार्य होतें. अशा या परंपरेचा वारसा असणाऱ्या महाराष्ट्रीय लेखकांना आवाहन करून हल्लींच्या बदललेल्या परिस्थितींत या प्राचीन परंपरेचा संदेश पाळा अशी विनंति करण्यांत मी कांहींच ' नवीन ' सांगत नाहीं. दूर दृष्टीनें विचार करणाऱ्या कोणत्याहि समंजस माणसाला पटण्याजोगी ही सूचना आहे.

## कांहीं आक्षेप

बहुजनसमाजाच्या भाषेंत कांहीं सांस्कृतिक वैगुण्य आहे अशा कल्पनेनें लेखभाषेंत जनतेंतील भाषिक विशेष आत्मसात् करण्यास अनेकांचा विरोध आहे. या विरोधकांच्या विधानांवरून ' संस्कार ', ' शिक्षण ', 'लेखभाषेचें वास्तव स्वरूप ' आणि ' बहुजनसमाजाची भाषा ' याबद्दल अस्पष्ट कल्पना आणि कांहीं मनोगंड

भारत-सरकारनें नवसाक्षरांसाठीं वाङ्मयनिर्मिति होण्याकरितां पारितोषिकें देण्याचें जाहीर केल्यामुळें केवळ महाराष्ट्रांतीलच नव्हे तर इतर प्रांतांतील सुद्धां बहुजनसमाजांच्या बोलींना असाधारण महत्त्व प्राप्त झालें आहे. भाषाशास्त्र, शिक्षणशास्त्र व साहित्यशास्त्र यांच्याशीं निगडित असणारा हा अखिलभारतीय स्वरूपाचा प्रश्न आहे. ' नवभारता'च्या सप्टेंबर१९५४ अंकामधील माझ्या लेखावर आलेल्या आक्षेपांचा व झालेल्या चर्चांचा हा सारांश प्रस्तुत प्रश्नाची शास्त्रीय बाजू विशद करील अशी अपेक्षा आहे – लेखक.







व्यक्त होतात. उदाहरणार्थ, 'नवभारता'च्या जानेवारी १९५५ च्या अंकांत (पृ. १६) श्री. धोंगडे लिहितात :

'संस्कारांनीं समाजाची घडण होत जाते. समाजास सुसंस्कृत करण्यास सुसंस्कार फार मोठें साहाय्य करतात. या निकषावर बहुजनसमाजाची असंस्कारित बोली घासून पाहिली तर ती लेखभाषेंत वापरणें योग्य ठरणार नाहीं.'

मराठींत 'संस्कार' शब्दाचे १६ अर्थ होतात. (पाहा: 'सरस्वतीकोश' भाग २ रा पृ. १८८१, तसेंच 'महाराष्ट्र-शब्दकोश' पृ. ३०६४, कृ. पां. कुलकर्णी-'व्युत्पत्ति-कोश' पृ. ७२२.) या १६ अर्थांपैकीं कोणत्या अर्थीं प्रस्तुत शब्द वापरला गेला आहे हें समजत नाहीं. तथापि श्री. धोंगड्यांनीं त्याच पत्रांत 'सांस्कृतिक परिणाम' या वापरलेल्या शब्दप्रयोगावरून 'विशिष्ट परिस्थिती- (situation) मध्यें झालेल्या विशिष्ट प्रतिक्रिये -( response )मुळें समाजावर उमटलेले ठसे' अशा अर्थीं तो शब्द योजला असावा असें वाटतें. 'संस्कार' शब्दाचा हा अर्थ गृहीत धरल्यास, विशिष्ट ऐतिहासिक व भौगोलिक परिस्थितींतून समाज जात असतां, कधीं परिस्थितीशीं झगडत, तर कधीं तिच्याशीं मिळतें घेत मानवसमाजाची घडण अनादिकालापासून होत आली आहे हें मान्य केलें पाहिजे. परिस्थितीशीं संघर्ष वा समझोता अथवा समन्वय करतांना समाजाला व्यापक अर्थी शिक्षण मिळत जातें. पण सर्व समाज विशिष्ट परिस्थितींतून जात असतां, त्या समाजांतील एका अल्पसंख्य गटावर उमटलेले ठसे तेवढे 'सुसंस्कार' व उरलेला बहुसंख्य समाज मात्र 'संस्कार-विरहित' असें सिद्ध होण्याजोगा पुरावा न मांडतां, बहुजनसमाजाच्या बोलीबद्दल 'असंस्कारित' असें म्हणणें अस्थानीं ठरेल. शिवाय धोंगड्यांची 'शिष्ट संस्कृति' ( High Culture ) आणि 'बहुजनसमाजाची संस्कृति' ( Mass Culture ) याबद्दलची काय कल्पना आहे हें त्यांच्या पत्रावरून समजत नाहीं. या दोन संस्कृतींच्या स्वरूपाबद्दल व परस्परसंबंधांबद्दल रूसोच्या काळापासून इतके वाद व इतकीं मतप्रदर्शनें झालीं आहेत कीं श्री. धोंगड्यांनीं संस्कारविषयक आपली कल्पना व निकष अधिक स्पष्ट केल्यास बरें होईल.

लेखभाषेशीं जवळ असणारी बोली ती 'सुसंस्कृत' असें मानण्यांत फसगत होते. श्री. व्यंकटेश माडगुळकर किंवा श्री. रणजित देसाई बहुजनसमाजाच्या बोलींत चांगल्यापैकीं ग्रामीण कथा लिहितात. श्री. बोरकर 'प्रजेचो आवाज' कोंकणींत काढतात. प्रा. श्रीराम अत्तरदे व श्री. बोरसे उत्तर महाराष्ट्रांतील बोलभाषांत साहित्य-निर्मिति करतात. हें सर्व लिखाण 'असंस्कारित' मानावयाचें कां ? ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास इत्यादि संतांनीं जें वाङ्मय लिहिलें किंवा यादव-कालापूर्वी महाराष्ट्रांत 'प्राकृत' व 'अपभ्रंश' या नांवांनीं ओळखल्या जाणाऱ्या मराठीच्या पूर्वरूपामध्यें 'गाथा-सप्तशती', 'लीलावती', 'करकण्डचरित' इत्यादि जे ग्रंथ लिहिले ते सर्व 'असंस्कारित' मानावयाचे का ? आणि जर हे ग्रंथ किंवा ज्ञानेश्वर-तुकारामादि संतांची साहित्य-निर्मिति जर 'सुसंस्कृत' व 'शिष्टमान्य' असेल तर यांतील शब्द व वाक्प्रचार वापरणाऱ्या बहुजनसमाजाच्या भाषेला, केवळ एक तथाकथित शिष्ट गट ते शब्द व वाक्प्रचार वापरीत नाहीं एवढ्याच कारणामुळें 'असंस्कारित' म्हणावयाचें का ? — उदाहरणार्थ :

१. ✓ दाव – णें 'दाखविणें' हा धातु आजच्या 'शिष्ट' मराठीत' नाहीं. पण हा ज्ञानेश्वरींत १२५ वेळां आला आहे. (डॉ. मु. ग. पानसे–'Linguistic Peculiarities of ज्ञानेश्वरी' पृ. ३६७ पाहा-तसेंच शि. न. भावे-ज्ञानेश्वरी शब्दार्थकोश पृ. १९५). यादव-कालापूर्वी इ. स. च्या १० व्या शतकांत पुष्पदंताचें 'नागकुमारचरित' (उदा. १०.४) व इ. स. च्या ११ व्या शतकांतील कनकामरकृत 'करकण्ड-चरित' ( उदा. १०.७.५ ) या अपभ्रंश-काव्यांत तो वापरलेला आहे. महाराष्ट्राबाहेरहि ( उदा०, गुजरातमध्यें ) हा शब्द वाङ्मय-निबद्ध होता हें हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरणावरून (८.४.३२) दिसतें.

२. ✓ ले – णें 'धारण करणें' हा आज 'अशिष्ट' मानला गेलेला धातु ज्ञानेश्वरींत २४ वेळां आला आहे ( पानसे – 'Linguistic Peculiarities of ज्ञानेश्वरी' पृ. ५३३ – ३४, तसेंच भावे – 'ज्ञानेश्वरी शब्दकोश' पृ. ३७२ ). यादव-कालापूर्वी महाराष्ट्रांत इ. स. च्या ११ व्या शतकांत ( उदा. करकंडचरित २.१.९,२.६.५ इ. ठिकाणीं ) व इ. स. च्या १० व्या शतकांतील पुष्पदंत-विरचित 'महापुराण' या अपभ्रंशामधील महाकाव्यांत ( उदा. ८४.१४.११, ८४.







१५.६ इ. ) हा धातु अनेकदां उपयोगांत आलेला आहे. प्रस्तुत लेखकाचें 'अपभ्रंशाचें ऐतिहासिक व्याकरण' (सूचि पृ. ४३८) पाहतां हा धातु 'अपभ्रंश-काळांत' (इ. स. ५००-१२०० ) कर्नाटक ते आसामपर्यंत बोलल्या जाणाऱ्या सर्व भारतीय आर्य-भाषांत वापरला जाई असें दिसेल.

३. दाल्ला = 'नवरा' या 'अशिष्ट' शब्दाचें पूर्वरूप दाद्ला < दादला, < 'दादुला' ज्ञानेश्वरींत अनेकदां येतें, व त्याचे अर्थ 'मर्द, शूर' (ज्ञाने. १.३५ ), 'समर्थ' (ज्ञाने. ५.८१ ), 'धनी' (ज्ञाने. १८.१७११ ) असे आहेत. ( भावे-ज्ञानेश्वरी-शब्दार्थकोश पृ. १९४. )

हा लेख भाषाशास्त्रावरील नसल्यामुळें अधिक उदाहरणें देण्याचा मोह टाळतों. परंतु भाषाशास्त्राचें महत्त्वाचें तत्त्व हें कीं सर्व मानवी भाषा सारख्या आहेत. विचार व्यक्त करण्याची गरज भासली कीं त्या समाजाची भाषा तितकी कार्यक्षम व संपन्न होते. हॉटेंटॉट समाजाला रसेलचें नीतिशास्त्र व आइन्स्टाइनचे सापेक्षतावादाचे सिद्धान्त पेलण्याचें सामर्थ्य आलें वा आवश्यकता भासली तर त्या समाजाच्या भाषेला इंग्लिश, फ्रेंच किंवा जर्मन भाषांप्रमाणें कार्यक्षमता व संपन्नता प्राप्त होईल. मुख्य मुद्दा इतकाच कीं बहुजन-समाजाच्या भाषेला 'असंस्कारित' म्हणून हिणविणें युक्त नव्हे.

### शैक्षणिक व्यवहार्यता

तथाकथित पुढारलेल्या लोकांची लेखभाषा आदर्श मानून बहुजनसमाजाला त्या भाषेवर प्रभुत्व मिळवून देण्याचा प्रयत्न करावयाचा म्हटलें तरी तें शक्य आहे का ? भाषा माणसाच्या सामाजिक परिस्थिती-( social heredity )चा परिपाक असून, त्या भाषेसह मुलगा शाळेंत येतो. शाळेंत सर्वच्या सर्व वेळ शिष्टभाषा ऐकण्या-बोलण्यांत गेला ही आज अशक्य असणारी गोष्ट शक्य मानली तरी मुलाला रोज १८ तास काढावे लागणारी शाळेबाहेरील परिस्थिति '(environment') शाळेंतील भाषिक संस्कार टिकविण्यास पोषक नसते. शिक्षकाच्या प्रयत्नाच्या या मर्यादा आय्. ए. रिचर्ड्स यांनीं 'Interpretation in Teaching' या पुस्तकांत स्पष्ट केल्या आहेत. ते स्पष्ट शब्दांत म्हणतात, "... the pupil, however stupid & inert he may seem, has already somehow learnt to talk, which is much more than we could teach him to do if he did not do it for himself. He comes to us with these uncanny powers already highly developed, and we have only, if we can, to help him to develop them a little further." ( पृ. १८ )

एका भिन्न संदर्भात व्यक्त केलेले हे विचार येथें अक्षरशः लागू पडतात. याशिवाय देशांतील सद्यःकालीन सांपत्तिक परिस्थिति, शाळांचा अभाव, शिक्षकांचा तुटवडा, शैक्षणिक साधनांचें दुर्भिक्ष्य, पालकांचें अज्ञान, अनास्था व दारिद्र्य इत्यादि कारणांमुळें बहुजनसमाजाला सुशिक्षित होण्यास फारच दीर्घ कालावधि लागेल. प्रौढ-मतदानपद्धतीवर आधारलेली लोकतंत्र सत्ता अधिकाधिक यशस्वी व कार्यक्षम करण्याला हा कालावधि परवडणारा नाहीं. श्री. धोंगड्यांच्या पत्रांतील आत्मतुष्टि ( self-complacency) देशाच्या हिताची नाहीं. शिक्षणाचा प्रसार दाखवणारे सरकारी रिपोर्टांतील आंकडे ( त्यांतील कोणीहि परत निरक्षर होत नाहीं असें गृहीत धरलें तरी ) व लोकसंख्येच्या वाढीमुळें व आजपर्यंत सक्तीच्या शिक्षणाच्या क्षेत्रांत न आलेल्या ग्रामीण व फिरस्त्या लोकसंख्येमुळें पडणारी भर लक्षांत घेतां, सर्व लोकांना सुशिक्षित करणें किती अवघड कार्य आहे हें स्पष्ट होतें. शिवाय सर्व समाज सुशिक्षित होत जात असतां 'बोलभाषा नि लेखभाषा यांच्या सीमारेषा परस्परांत मिळून जातील' हा धोंगडे यांचा आशावाद भोळसर आहे. बोलभाषा व लेखभाषा एकरूप होण्याचें किंवा करण्याचें ध्येय अशक्य कोटींतील आहे. बोलभाषा लेखभाषेपेक्षां अधिक गतिमान् असल्यामुळें ती लेखभाषेपासून भिन्न होत जाणें अपरिहार्य असतें.

दुसरा मुद्दा असा कीं कांहीं अकल्पित घटनांनीं बहुजनसमाजाला आजची शिष्टसमाजाची लेखभाषा तावडतोब शिकवली जाण्याची सोय झाली असें गृहीत धरलें तरी तें इष्ट आहे का ? असें होण्यांत शिष्टसमाजाच्या भाषेंत बहुजनसमाजाच्या भाषेंतील शब्दसंपत्ति व वाक्प्रचार यांची भर न पडल्यामुळें शिष्टसमाजाची भाषिक वंचना होणार नाहीं








का ? भागीरथीचें सामर्थ्य तिला मिळणाऱ्या अनामिक ओढे-ओहोळापासून यमुना-शोणभद्रादि नद्यांवर अवलंबून नाहीं का ?–लेखकांना अतिशय उपयुक्त असणाऱ्या रॅजेच्या कोशा-(Roget's Thesaurus) प्रमाणें सूक्ष्म अर्थछटा व्यक्त करणारा मराठी कोश करण्याचा प्राथमिक प्रयत्न करतांना या तथाकथित शिष्ट भाषेचें दारिद्र्य उघडें पडतें. युरोपियन किंवा अमेरिकन साहित्यांतील विचार व्यक्त करतांना संस्कृतच्या साहाय्यानें नवीन शब्दांची निर्मिति करून भाषेंत बोजडपणा आणण्यापेक्षां आपल्या उपेक्षेनें लेखनिबद्ध न झालेले पण सुटसुटीत व अर्थवाही असलेले मराठी शब्द वापरणें अधिक श्रेयस्कर नाहीं का ? शिवाय प्रश्न असा उद्भवतो कीं कांहीं ऐतिहासिक घटनांनीं ('अपघातानें' हवें तर म्हणा) महाराष्ट्राच्या एका छोट्या भूविभागांतील बोलभाषेला शिष्टमान्य लेखभाषा होण्याचें (निदान अत्यंत निकटवर्ती असण्याचें) भाग्य लाभलें तरी महाराष्ट्रभर विखुरलेलें भाषिक धन मातीमोल मानून तें गमावण्याचा आपल्याला काय अधिकार आहे ? वऱ्हाडपासून गोमांतकापर्यंत राजकीय सत्ताकेंद्रें फिरत असतां राजमान्यता मिळून श्रेष्ठ ग्रंथसंपात्ति निर्माण करणाऱ्या व आज बोलीस्वरूपांत आमच्या अडाणी अहंकारामुळें विनाकारण निकृष्ट समजल्या जाणाऱ्या बोलभाषांना सामावून घेऊन आजच्या शिष्ट भाषेनें संपन्न बनणें अधिक हितकारक नाहीं का ?

## वाङ्मयीन वास्तवता

या प्रश्नाला आणखी एक बाजू आहे. वाङ्मयांत वास्तववादाला असाधारण महत्त्व आहे. गोमंतकाच्या सुंदर पार्श्वभूमीवर कथा रंगवितांना, खानदेशांतील तापी-तीरावरचें सुखी वातावरण निर्माण करतांना, किंवा ठाणें जिल्ह्यांतील वारल्यांचे कष्टदायक जीवन-संघर्ष वर्णन करतांना विशेषनामें (nomina propria), निसर्ग (fauna & flora), व्यक्तिदर्शन व संभाषण या सर्वांतून ती प्रादेशिक वास्तवता प्रकट होणें आवश्यक आहे. तापीतीरावरील लेवा-कुणबी कृष्णाकांठच्या मराठी बोलींत बोलतांना दाखवणें हास्यास्पद आहे. शिष्ट मराठींत हे शब्द रूळण्यासाठीं कांहीं दिवस पदटीपा वा कंसांत अर्थ द्यावे लागतील, पण त्याला बिचकण्याचें कांहीं कारण नाहीं. हार्डीच्या प्रादेशिकतेचें कौतुक करावयाचें व स्वतःचें लेखन मात्र अवास्तव असावयाचें यांतील विनोद लेखकांना भूषणावह नाहीं. बहुजनसमाजाच्या भाषेला प्रयत्नपूर्वक आत्मसात् करण्याची जबाबदारी मुख्यतः ललित लेखकांवर आहे. जनतेच्या बोलींतील चांगले विशेष आत्मसात् करून आमचे साहित्यिक जर उत्तमोत्तम वाङ्मयकृति निर्माण करतील तरच (एरवी नव्हे) त्यांचा क्रमिक पुस्तकांत अंतर्भाव करणें शिक्षणशास्त्रदृष्ट्या उपयुक्त व योग्य ठरून ती नवीन पिढीची शिष्टभाषा ठरेल. नवसाक्षर झालेल्या प्रौढांसाठीं त्या त्या प्रदेशांतील बहुजनसमाजाच्या भाषेंत प्रत्यक्ष शब्दगणने-(word-and phrase-frequency lists) वर आधारलेलीं छोटीं छोटीं पुस्तकें लिहिणें हा शिक्षण-शास्त्रज्ञांचा खडतर मार्ग आहे. या विषयावर मी स्वतंत्र लिहीत असल्यामुळें, प्रस्तुत लेखामध्यें भाषेची अभिवृद्धि करण्याचें सामर्थ्य असणाऱ्या शब्द-सृष्टीच्या ईश्वरांना – ललित लेखकांना मी या कामीं सहकार्य देण्याचें आवाहन आवर्जून करीत आहे.

बहुजनसमाजांतील शब्द 'हलके', 'निकृष्ट' असें मानण्यांत कांहीं अशास्त्रीय कल्पना आहेत. शरीरशास्त्रांत सर्व अवयवांना सारखेंच महत्त्व असतें त्याप्रमाणें भाषाशास्त्रांत सारे शब्द (अपशब्द सुद्धां) समान महत्त्वाचे असतात. या शब्दामागें मानव-वंश-शास्त्राच्या दृष्टीनें उच्च-नीचपणा सुचवावयाचा असेल तर ती कल्पना फोल आहे. त्यामुळें 'लेखभाषेंत ग्रथित झालेले मौलिक विचार हे कांहीं उंच पातळीचे असल्यानें विशिष्ट परिभाषेचा साज घेऊनच व्यक्त होतात. यांत शैलीचा वृथाभिमान नाहीं' असें श्री. धोंगडे म्हणतात. तेव्हां त्यांना नेमकें काय म्हणावयाचें आहे हें लक्षांत येत नाहीं. न्याय, पदार्थविज्ञान, रसायन, भूमिति इत्यादि शास्त्रांत परिभाषेची आवश्यकता आहे हें मी कधींच अमान्य केलेलें नाहीं. तथापि त्यांनीं या विषयावर अधिक स्पष्ट लिहिल्यास मला माझें म्हणणें मांडतां येईल.

मी शिष्टभाषेच्या हिताच्या दृष्टीनें तिनें अखिल महाराष्ट्रांत विखुरलें गेलेलें भाषिक धन आत्मसात् करून त्याचें संरक्षण व स्वतःचें संवर्धन करावें एवढें सुचवीत आहे आणि यासाठीं आमच्या लेखकांनीं प्रयत्न करावा अशी विनंति करीत आहे.








# श्रीगोविंदराव कोरगांवकर धर्मादायसंस्थेचें स्नेहसंमेलन

कोल्हापुरच्या **श्रीगोविंदराव कोरगांवकर** धर्मादायसंस्थेतर्फे संस्थेच्या कार्यकर्त्यांचें व इतर निमंत्रितांचें **स्नेहसंमेलन** गेल्या १६ व १७ मे १९५५ रोजीं भरलें होतें. श्रीगोविंदराव कोरगांवकर धर्मादायसंस्थेचें व त्यातर्फे दरवर्षी भरविल्या जाणाऱ्या स्नेहसंमेलनाचें उद्दिष्ट व कार्य किती वैशिष्ट्यपूर्ण व अभिनव आहे याची कल्पना 'नवभारता'च्या वाचकांस आहेच. गेल्या वर्षाच्या स्नेहसंमेलनाच्या निमित्तानें त्या उपक्रमाचें वैशिष्ट्य प्रकट करून दाखविणारा श्री. दि. के. बेडेकर यांचा लेख 'नवभारता'च्या जून १९५४ च्या अंकांत प्रसिद्ध झालेला आहे.

श्रीगोविंदराव कोरगांवकर धर्मादाय-संस्था १६ मे १९४६ रोजीं स्थापन झाली. या संस्थेचें एक अत्यंत महत्त्वाचें उद्दिष्ट व कार्य "आपलें सर्व आयुष्य ज्यांनीं समाजसेवेला वाहिलेलें आहे व जे एका उदात्त जीवननिष्ठेनें आपलें जीवन कंठूं इच्छितात अशा समाजसेवकांचा एक भ्रातृसंघ निर्माण करणें" हें आहे. या उद्दिष्टानुसार या संस्थेच्या विद्यमानें पण स्वायत्त असा एक 'सेवकसंघ' स्थापन झाला आहे. या 'सेवकसंघां'त श्री. शंकरराव देव, श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे, श्री. अप्पासाहेब पटवर्धन, श्री. माधवराव बागल, आचार्य शं. द. जावडेकर, आचार्य स. ज. भागवत, श्री. एस्. एम्. जोशी, श्री. वसंतराव नारगोळकर, श्री. जे. पी. नाईक, मध्यप्रदेशांत कुष्ठरोगपीडितांची सेवा करणारे श्री. आमटे इत्यादींसारखे विविध कार्यक्षेत्रांतील, विविध प्रवृत्तींचे विचारवंत व कार्यकर्ते आहेत. या सेवकसंघाचें दर वर्षी एक स्नेहसंमेलन भरविण्यांत येत असतें. या स्नेहसंमेलनाला सेवकसंघाच्या कार्यकर्त्यांबरोबर इतरहि विविध विचारांच्या प्रमुख कार्यकर्त्यांना व व विचारवंतांना निमंत्रण देण्याची इष्ट अशी प्रथा गेलीं ७/८ वर्षें पडली आहे. या उपक्रमामुळें हें स्नेहसंमेलन म्हणजे भिन्नभिन्न विचारसरणींच्या विचारवंतांचें मुक्त विचारविनिमयाचें एक अनौपचारिक वैचारिक व्यासपीठ बनलें आहे. भिन्न भिन्न विचारसरणींच्या व्यक्ती दोन दिवस एकत्र येऊन देशासमोर असलेल्या महत्त्वाच्या प्रश्नांवर मोकळेपणानें चर्चा करतात, दुसऱ्यांचीं मतें सहिष्णुतेनें समजावून घेतात. हा उपक्रम घडवून आणण्याच्या मागें संस्थेच्या चालकांचा नम्र हेतु, भिन्नभिन्न विचार-संप्रदायांच्या कार्यकर्त्यांमध्यें विचारविनिमय घडवून आणून परस्परांतील गैरसमज, कटुता, संघर्ष कमी करणें व मतभेद ठेवूनहि परस्परांत उदार सुहृद्भाव निर्माण करण्यास साहाय्य करणें, हा आहे. असा हा अभिनव उपक्रम महाराष्ट्रांत योग्य तें वैचारिक वातावरण निर्माण करण्याच्या दृष्टीनें एक मोठें आशास्थान होय असें अनेक विचारवंतांनीं प्रांजलपणें बोलून दाखविलें आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या परंपरेनुसार यंदाचेंहि स्नेहसंमेलन भरविण्यांत आलें होतें. या संमेलनाला श्री. शंकरराव देव, श्री. अप्पासाहेब पटवर्धन, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, श्री. माधवराव बागल, श्री. वसंतराव नारगोळकर, श्री. जे. पी. नाईक इत्यादि संस्थेच्या सेवकसंघाचे सदस्य व इतर स्थानिक गृहस्थ हजर होतेच; त्याशिवाय त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. गं. बा. सरदार, श्री. दि. के. बेडेकर, श्री. र. के. खाडिलकर, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. ना. र. देशपांडे, प्रा. दे. अ. दाभोलकर, प्रा. मा. प. मंगुडकर, श्री. वामनराव यार्दी, श्री. मेमाणे, राष्ट्रसेवादलाचे श्री. डेंगळे इत्यादि विविध क्षेत्रांतील कार्यकर्ते व विचारवंत उपस्थित होते.

या स्नेहसंमेलनांत प्रामुख्यानें तीन महत्त्वाचे विषय चर्चिले गेले. पहिला विषय '**भूदान-आंदोलन**' हा होता. मध्यप्रदेशांतील एका अनुभवी कार्यकर्त्यानें अशी एक शंका प्रदर्शित केली कीं, मध्यप्रदेशांतील कांहीं जमीनदारांच्या सुसंघटित विरोधामुळें, कांहीं काळानें जनता चिडून जाऊन शेवटीं हिंसक, अत्याचारी प्रकारांचा अवलंब करील कीं काय याची भीति वाटते. या शंकेच्या निमित्तानें भूदान-आंदोलनाचें तत्त्वज्ञान, ध्येय व कार्यपद्धति या व्यापक प्रश्नावर चर्चा झाली. विविध दृष्टिकोन मांडले गेले. भूदान-आंदोलनाचें तत्त्वज्ञान, ध्येय व कार्यपद्धति यांचें सार एका चतुःसूत्रीच्या








रूपानें मांडलें गेलें. ती चतुःसूत्री अशी: १ सर्व भूमि गोपालकी. २ विश्वस्त-व्यवस्थापक गांव. ३ वहिवाटदार व्यक्ति. ४ पद्धति सहकारी. – लहानलहान जमीनवालेहि भूमिदान करीत आहेत, या आंदोलनांत वर्गविग्रहाला जागा नाहीं, आज सर्वत्रच जमिनीवरील स्वामित्वाच्या कल्पनेचें बूडच उखडलें जात आहे, त्यामुळें भूदान-चळवळीला एकंदर वैचारिक वातावरण अनुकूल असेंच आहे, मूठभर जमीनदारांचा विरोध तेव्हांच कोलमडून पडेल-इत्यादि विचार प्रदर्शित केले गेले. याउलट, भूदान-आंदोलनामागील विचारसरणि व त्याचें तंत्र बुद्धिवाद-विरोधी, मध्ययुगीन आहे असाहि एक मूलगामी आक्षेप शास्त्रीय मानवतावादाच्या भूमिकेवरून मांडला गेला. भूदान-आंदोलन एका बाजूला जमीनीवरील व्यक्तीचा मालकी हक्क नाहींसा करून जमीन हें महत्त्वाचें उत्पादनसाधन समाजाच्या मालकीचें करूं इच्छितें, तर दुसऱ्या बाजूला तें प्रगत ( advanced ) यांत्रिक उत्पादनसाधनांना विरोध करून, जुने ग्रामोद्योग व त्यांचीं उत्पादनसाधनें हीं शक्य तों व्यक्तीच्या मालकीचीं ठेवण्याचा आग्रह धरतें, अशी ही एक भूदान-विचारांत अंतर्गत विसंगति आहे – असाहि एक युक्तिवाद मांडला गेला. भूदान – आंदोलनाच्या अंतिम ध्येयांत स्वयंपूर्ण ग्रामरचनेवर भर आहे, पण ग्राम किंवा 'गांव' म्हणजे तरी काय याची निश्चित स्पष्ट कल्पना नाहीं, ग्रामाविषयीं जी परंपरागत कल्पना मांडली जात आहे, ती आधुनिक प्रगत वैज्ञानिक तंत्राच्या काळांत मागासलेली ठरूं पहात आहे – इत्यादि विचार कांहींकडून प्रकट केले गेले.

भूदान-आंदोलनावर, हें आंदोलन बुद्धिवादविरोधी आहे असा एक आक्षेप घेतला गेला होता. त्यांतील सूत्र घेऊन संमेलनामध्यें बुद्धिवाद किंवा बुद्धिप्रामाण्य-वाद हा विषय चर्चेकरितां घ्यावा असें ठरलें व त्यावरील चर्चा चांगली रंगली. मानवी जीवनांतील अंतःप्रेरणा व भावना यांचें महत्त्व मान्य करून देखील शेवटीं बुद्धीचें समाधान होणें ही कसोटी सामाजिक व्यवहारांत तरी लावली गेली पाहिजे; समाजाला रूढीच्या, अंध समजुतींच्या पाशांतून मुक्त करावयाचें, तर अंतःप्रेरणा, गूढता यांवर भर न देतां बुद्धिवादाचाच आश्रय केला पाहिजे; व्यक्तिस्वातंत्र्य व लोकशाही यांची बुद्धिवादाशीं सांगड घालतां आली पाहिजे; बुद्धीच्या अंतिम मर्यादा असतीलहि, पण आजचें आपलें शबल सामाजिक व राजकीय जीवन बघतां तें शुद्ध व्हायचें असेल तर बुद्धिवादाच्या मर्यादा दाखविण्याऐवजीं, बुद्धिवादाचें सामर्थ्य विचारवंतांनीं समजावून सांगितलें पाहिजे – अशी एक विचारसरणि पुढें मांडली गेली. यावर, नुसता बुद्धिवाद हा तर्कटी होऊं शकतो; बुद्धिवाद अनेक अनिष्ट अविवेकी गोष्टींचें 'विवेकीकरण' ( rationalization ) मोठ्या धूर्ततेनें करतो; बुद्धिवादी लोकहि शुष्क कर्मकांड्यांप्रमाणें बुद्धिवादाचें नुसतें 'रटन' करीत जीवनविमुख बनून रहातात; बुद्धीच्या सामर्थ्याबरोबर तिच्या मर्यादाहि आपण समजावून सांगितल्या पाहिजेत; वासना व विकार यांच्यापासून बुद्धि मुक्त करतां आली, बुद्धि जर खरोखरीं 'शुद्ध' झाली तरच तो खरा बुद्धिवाद म्हणतां येईल – असाहि प्रतिवाद झाला. बुद्धिवाद ही जीवननिष्ठा होऊंच शकत नाहीं, जीवननिष्ठा हा अनुभूतीचा विषय आहे असें एका वक्त्यांनीं सांगितलें. त्यावर, बुद्धि ही एक अनुभवांना सुसंगति आणणारी श्रेष्ठ शक्ति आहे, विश्वाच्या नियमबद्धतेचें आकलन करणाऱ्या मानवी बुद्धीला सुसंवादित्वा-( harmony )चा, सुसंगतितत्त्वा-( unifying principle )चा साक्षात्कार होतो; या दृष्टीनें बुद्धिवाद ही एक श्रेष्ठ जीवननिष्ठा होऊं शकते, असें मांडलें गेलें. अंतःप्रेरणा, स्फूर्ति ( intuition ) हा मूलतः प्रच्छन्न बुद्धितत्त्वाचाच आविष्कार होय, असेंहि प्रतिपादिलें गेलें.

यानंतर संमेलनांत चर्चेचा तिसरा विषय '**भारतीय संस्कृति व प्रांतांची संस्कृति यांमधील परस्पर संबंध**' असा होता. अखिलभारतीय संस्कृतीचीं कांहीं विशिष्ट व्यवच्छेदक लक्षणें आहेत काय, भारताच्या विविध प्रांतांतून त्या त्या प्रांताची भाषा, साहित्य, मनोरचना, संस्था यांत कांहीं पृथगात्मता आहे काय, अखिल-भारतीय संस्कृति व भारताच्या विविध घटक प्रांतांची संस्कृति यांच्या अन्योन्य संबंधाचा विचार करतां हा संबंध कशा प्रकारचा आहे, एकांतून अनेकत्व आलें आहे कीं अनेकांतून एकत्व आलें आहे, एकाच वृक्षाच्या अनेक शाखा आहेत कीं एकच नदी विविध भूभागांतून वहात गेली आहे असें समजावयाचें – असे अनेक प्रश्न पुढें आले. आध्यात्मिक अनुभवाची

तळमळ, निर्वैर, करुणापूर्ण अंतःकरण, सहिष्णुता (Mysticism and Charity) हीं भारतीय संस्कृतीचीं अक्षर मूल्यें आहेत, असें एका वक्त्यांनीं सांगून महाराष्ट्रीय संस्कृतीचीं वैशिष्ट्यें म्हणून स्वातंत्र्यप्रेम, विद्येवरील निष्ठा, त्यागी जीवनाची आवड, अद्वैत व भक्ति यांत दिसून येणारी समन्वयाची वृत्ति, संन्यास व निवृत्ति यांऐवजीं प्रवृत्तीकडे झुकणारी नैतिक प्रवृत्ति – हीं कथन केलीं. याच्या उलट, भारतीय संस्कृतीचें एक मोठें वैशिष्ट्य कर्मवाद हें होय; मोक्ष म्हणजे कर्मबंधापासून मोक्ष; भारतीय संस्कृति ही प्रामुख्यानें ग्रामप्रधान आहे; ग्रामप्रधान जीवनांत मधून मधून नागर संस्कृतीचीं कांहीं बेटें दिसून येतात एवढेंच; भारतीय जनतेचें जीवन कर्मवादानें जखडलें जाऊन व्यक्तीला स्वातंत्र्य राहिलें नाहीं; म्हणून यापुढें भारतीय संस्कृतीच्या भूतकाळाकडे न बघतां तिची मानव्याच्या मूल्यांवर नवीनच घडण केली पाहिजे; मानवी मूल्यांवर अधिष्ठित अशी खरी लोकशाही प्रस्थापित करावयाची असेल तर लोकभाषा, लोकसाहित्य यांना संपूर्ण वाव दिला पाहिजे; या दृष्टीनें भाषावार प्रांतरचना भारतीय लोकशाहीच्या संवर्धनाला पोषकच होईल– अशीहि विचारसरणि पुढें मांडली गेली.

स्नेहसंमेलनांत झालेल्या चर्चेत उपस्थित झालेले विविध विषयांतील महत्त्वाचे मुद्दे वर दिले आहेत. वरील वर्णनांत रूक्ष वाटणारे हे विविध विचार प्रत्यक्ष चर्चेच्या वेळीं किती सरसपणें व जिवंतपणें मांडले गेले असतील याची सहृदय वाचक कल्पना करूं शकतील. हे विविध विचार मांडणारे वक्ते अलिप्ततावादी निष्क्रिय पर्यंकपंडित नसून आपापल्या विविध कार्यक्षेत्रांत निष्ठेनें कार्य करणारे क्रियाशील विचारवंत व कार्यकर्ते आहेत ही गोष्ट लक्षांत घेतल्यास, या चर्चेतील विविध विचारसरणींमागील प्रामाणिक सत्यसंशोधनाच्या दृष्टीची कल्पना करतां येईल. अशा जिव्हाळ्याच्या विचारविनिमयांतच या चर्चेचें व स्नेहसंमेलनाचें साफल्य आहे. संमेलनांत कोणतेहि ठराव वा कार्यक्रम पास झाले नाहींत. किंबहुना तसा संमेलनाचा उद्देश नाहीं व असूंहि नये असें ठरलें. संमेलनाचें स्वरूप केवळ वैचारिक ठेवावें, आपल्या समाजापुढील जिव्हाळ्याच्या प्रश्नांवर मोकळेपणानें आपले विचार प्रकट करणें व इतरांचे समजावून घेणें एवढेंच सध्यां अशा संमेलनाचें उद्दिष्ट व स्वरूप असावें असें सर्वानुमतें ठरलें.

— वि. म. वेडेकर

---

## प्रतीक्षा !

वाट किती पाहूं तुझी
हृदयांत भारावून !
ठिबकल्या नक्षत्रांची
व्योमगङ्गा साकारली.

चन्द्र-सूर्य आळीपाळी
द्वारपाळ झाले माझे;
काळवण्डले रे तेही
चाहूल ना तुझी मुळीं !

कृष्ण-शुभ्र मेघ-राजी
वाळयाचा कीं पङ्खा हाले !
सुगन्धला वायु वाहे
शिम्पूनिया शीत-जलें.

दिन-रात्र झाले माझे
उधाणले श्वासोच्छ्वास
धडधड शमवाया
येई येई झडकरी !

तुझ्या गूढ गान-सरी
हृदयांत नादावती
थबकतें भाम्बावून
दाही दिशांच्या गवाक्षीं.

अनन्ताच्या अङ्गणांत,
उमलली जीव-कळी
युगायुगांचे हे क्षण,
मोजूनियां कोमेजली !

— अनिलकुमार







## आंतरराष्ट्रीय राजकारण

# सार-संकलन

### बांडुंग-परिषदेचें मार्गदर्शन

बांडुंग येथें आफ्रिका-आशियापरिषदेसाठीं जमलेल्या प्रतिनिधींनीं परिषदेच्या शेवटीं एक संयुक्त निवेदन प्रसिद्ध केलें. जागतिक शांतता आणि निरनिराळ्या राष्ट्रांचें पारस्परिक सहकार्य प्रस्थापित व्हावें, परस्परांविषयींचा अविश्वास आणि भीति यांपासून मुक्त होऊन, विश्वासाची व सद्भावनेची दृष्टि स्वीकारून राष्ट्रांनीं सहिष्णुतेच्या व शांततेच्या वातावरणांत शेजारधर्मानें वागावें आणि एकमेकांशीं मैत्रीचे व सहकार्याचे संबंध वाढवावेत–याकरितां आधारभूत म्हणून पुढील दहा तत्त्वें या निवेदनांत नमूद करण्यांत आलीं आहेत :

१. मूलभूत मानवी हक्कांना आणि सार्वराष्ट्रीय संघटनेचे हेतू आणि तिच्या घटनेंतील तत्त्वें यांना आदरयुक्त मान्यता देणें.

२. सर्व राष्ट्रांचें सार्वभौमत्व आणि त्यांच्या अधिकारक्षेत्रांतील भूमि यांना आदरयुक्त मान्यता देणें.

३. सर्व मानववंश आणि लहानमोठीं सर्व राष्ट्रें यांचा समान दर्जा मान्य करणें.

४. दुसऱ्या राष्ट्राच्या अंतर्गत जीवनांत ढवळाढवळ वा हस्तक्षेप करण्याचें टाळणें.

५. प्रत्येक राष्ट्राचा वैयक्तिक आणि सार्वराष्ट्रीय संघटनेच्या नियमानुसार सामुदायिक रीत्या आत्मसंरक्षणाचा हक्क मान्य करणें.

६. (अ) कोणत्याहि मोठ्या राष्ट्राच्या विशिष्ट हितसंबंधांचें रक्षण करण्यासाठीं निर्माण करण्यांत येणाऱ्या सामुदायिक संरक्षणयोजनांचा उपयोग न करतां त्यांपासून अलिप्त रहाणें;

(ब) कोणत्याहि राष्ट्रानें इतरांवर दडपण आणण्याचा प्रयत्न न करणें.

७. अन्य राष्ट्रांची भूमि वा राजकीय स्वातंत्र्य यांजवर प्रत्यक्ष आक्रमण न करणें वा त्याविरुद्ध अन्य स्वरूपांत सामर्थ्याचा उपयोग न करणें किंवा तसें करण्याची भीति देखील न दर्शविणें.

८. चर्चा, समझोता, लवाद किंवा न्यायनिवाडा या उपायांनीं त्याचप्रमाणें सार्वराष्ट्रीय संघटनेच्या नियमांशीं संवादी असलेल्या उभयपक्षीं संमत अशा अन्य शांततेच्या मार्गांनीं राष्ट्राराष्ट्रांतील सर्व कलह मिटविणें.

९. एकमेकांच्या हितसंबंधांची जपणूक करून सहकार्य वाढीस लावणें.

१०. न्याय आणि आंतरराष्ट्रीय संबंध यांतून निर्माण होणाऱ्या जबाबदाऱ्यांचें पालन करणें.

या तत्त्वानुसार मैत्रीनें आणि सहकारबुद्धीनें वागल्यास जागतिक शांतता आणि सुरक्षितता कायम रहाण्यास व अधिक दृढ होण्यास परिणामकारक मदत होईल अशी या आफ्रिका-आशिया-परिषदेस खात्री वाटते; त्याचप्रमाणें आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनांतील सहकार्य हें सर्वांच्या विकासाला आणि कल्याणाला पोषक ठरल्यावांचून रहाणार नाहीं, असें निवेदनांत म्हटलें आहे.

### बांडुंग-परिषदेची फलश्रुति

" आपली पहिलीच महत्त्वाची बैठक औचित्यपूर्ण गांभीर्याच्या व शहाणपणाच्या वातावरणांत पार पडलेली पाहून आफ्रिकाखंडाला आणि आशियाखंडाला अत्यंत समाधान वाटणें स्वाभाविक आहे. बांडुंग-परिषदेची या दृष्टीनें कोणत्याहि आंतरराष्ट्रीय परिषदेशीं तुलना करतां येईल. इतर अनेक अशा परिषदांपेक्षां ही परिषद् अधिक चांगल्या रीतीनें पार पडली आहे.

" परिषदेंतील वातावरण समझोत्याचें होतें. तिच्यांत भाग घेणारांची आजवरची केवळ ' वाईट '








चा ' चांगलें ', ' काळें ' वा ' पांढरें ' अशा स्थूल दृष्टीनें जीवनाकडे पहाण्याची संवय ध्यानांत घेतल्यास, परिषदेंतील वातावरणहि त्यांच्या राजकीय प्रगल्भतेच्या वाढीचीच सूचक खूण म्हटली पाहिजे. बांडुंग येथें, समझोत्याचा अर्थ सुपरिचित झालेल्या सामान्य अर्थ-शून्य गोष्टींना सर्वांनीं गांभीर्याचा आव आणून मान्यता द्यावयाची असा केला गेला नाहीं. एकमेकांना चर्चेत पुष्कळच धक्के व कोपरखळ्या दिल्या गेल्या आणि अनेक कटाकटीच्या झगड्यांतूनच अखेरच्या निवेदनांत व्यक्त झालेलें ऐकमत्य अत्यंत परिश्रमानें साधलें गेलें.

" वसाहतींच्या प्रश्नासंबंधीं परिषद् दोन भिन्न प्रवृत्तींकडे खेचली जात होती. एकीकडे, जमलेल्या आफ्रिकेंतील व आशियाई प्रतिनिधींनीं सर्व जुन्या अन्यायांचा पाढा वाचला आणि तें स्वाभाविकहि होतें. परंतु उलट दुसरीकडे मंगोलियासारख्या तथा-कथित स्वतंत्र राष्ट्राला आमंत्रणहि दिलें गेलें नाहीं. पण गोल्ड कोस्टला मात्र इतर प्रतिनिधींबरोबरच समान दर्जानें वागविण्यांत आलें आणि अशा प्रकारें परिषदेची वास्तव दृष्टीहि व्यक्त झाली.

" वसाहतींतील राजवटींचा निवेदनांत धिक्कार करण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें जनतेला परकीय सत्तावर्चस्वाखालीं व शोषणाखालीं राखणें धिक्कारण्यांत आलें आहे. या वेगळ्या गटाचा उल्लेख होत असतांना चौएनलाय् यांना काय वाटत असेल हें सांगणें शक्य नाहीं. तथापि जमलेल्या कित्येक आशियाई व अरब प्रतिनिधींनीं इतरांबरोबरच सोविएट रशियांतील मुसलमान प्रजा व पूर्व युरोपची जनता त्यांच्या डोळ्यांपुढें होती असें दर्शविलें आहे.

" तथापि आशिया वा आशियाविषयीं सद्भावना बाळगणारे स्वतंत्र जगांतील सर्व लोक यांच्या दृष्टीनें विवेकपूर्ण विचार केल्यास परिषदेचें कार्य आशादायकच म्हटलें पाहिजे. परिषदेपूर्वीं ज्यांच्या मनांत अनेक निराशाजनक संशय होते त्या सर्वांनीं, बांडुंग येथें व्यक्त झालेली राजकीय जीवनांतील निरोगी व शहाणपणाचीं चिन्हें पहातां, परिषदेच्या कार्याची वाहवाच केली पाहिजे. " –' इकॉनॉमिस्ट ' ( लंडन, ३० एप्रिल १९५५ )

" बांडुंग येथें जें केलें वा बोललें गेलें त्यासंबंधीं कोणी कांहींहि म्हणोत, एवढें मात्र बहुधा सत्य म्हणून सांगतां येईल कीं ही परिषद् जर भरली नसती तर आशियांतील तटस्थ राष्ट्रांना चीनवर दडपण टाकून त्याला शांततेच्या बाजूला झुकवण्याची अशा प्रकारची दुसरी संधि मिळूं शकली नसती.

"अतिपूर्वेकडील तंग वातावरण सुधारण्यासाठीं आणि विशेषतः फॉर्मोसा भागांतील परिस्थिति सुधारण्याचा प्रश्न सोडवावा यासाठीं चीनचें सरकार अमेरिकेबरोबर एकत्र बसून चर्चा करावयास तयार आहे असे उद्गार चौएनलाय् यांनीं या परिषदेंत काढले. वर उल्लेख केलेल्या दबावावांचून ते त्यांना काढावे लागले असते कीं नाहीं या विषयीं अत्यंत मोठी शंका आहे. बहुधा तसें झालें नसतें."–' स्पेक्टेटर ' ( लंडन, २९ एप्रिल १९५५ ).

## चौएन् लाय् यांच्या सूचनेचें स्वरूप

" बांडुंग येथील परिषदेंत अमेरिकेशीं फॉर्मोसा-बाबत चर्चा करावयाची चीनची तयारी आहे, ही चौएन्लाय् यांनीं केलेली घोषणा म्हणजे एक बेछूट-पणाचा राजकीय डावपेच समजावयाचा ? कीं त्यांच्या अनिश्चित व दुहेरी वृत्तीखालीं खरोखरींच अशी चर्चा करण्याची इच्छा दडलेली असेल असें मानावयाचें ? मनांत कितीहि संशय असले तरी अमेरिका व ब्रिटन यांनीं चौची खरीखुरी चर्चेची इच्छा आहे असें गृहीत धरूनच वागलें पाहिजे. अन्य प्रकारचें वर्तन म्हणजे शुद्ध मूर्खपणा होय.

" चर्चेची ही सूचना चौनें गंभीरपणें केली आहे असें समजण्याचें दुसरें आणि अधिक बलवत्तर कारण आहे. शांतता प्रस्थापित करण्याची त्याची तयारी असण्याचाहि थोडासा संभव आहे. चीनचा फॉर्मोसा-वरील हक्क सोडून देणें त्याला अर्थातच शक्य नव्हतें. तथापि फॉर्मोसा ' मुक्त ' करण्याचें कार्य पुढें ढकल-ण्याची त्याची तयारी असावी. याविषयीं फारशी आशा नाहीं हें जरी खरें असलें तरी अंधुक वाटणा-ऱ्या या आशेच्या दिशेनेंच पुढें जाणें योग्य होईल.

" या दृष्टीनें आपापल्या विशिष्ट हक्कांच्या अंमल-बजावणीकरितां दोन्ही बाजूंनीं लष्करी सामर्थ्याचा उपयोग करूं नये या दिशेनें त्यांचें मन वळविण्याचें पहिलें महत्त्वाचें कार्य हातीं घेण्याचें सर अँथनी ईडन यांचें धोरण योग्य आहे. चर्चेसाठीं आपण तयार आहोंत या चौनें केलेल्या घोषणेच्या आधारें,











अनुक्रमणिका

लष्करी सामर्थ्याचा उपयोग करण्याचें धोरण तो स्थगित करावयास तयार आहे काय असा प्रश्न आपण त्यास विचारू शकतों काय ? तसें झाल्यास भावी समझोत्याचा पाया घातला जाईल. या मार्गाच्या शक्यतेची फारशी आशा नसली तरी त्या दिशेनें प्रयत्न हा झालाच पाहिजे. " — ' मँचेस्टर गार्डियन ' ( २५ एप्रिल १९५५ )

" डलस आणि चौएन्लाय् हे जवळजवळ येत आहेत. अद्यापि दोन्ही बाजूस बहुतांशीं संदिग्ध विधानेंच होत असलीं तरी दोघेहि चर्चेच्या भूमिकेकडे झुकत आहेत. यामुळें फॉर्मोसाकडील परिस्थिति बरीच निवळण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

" शनिवार ता. २३ एप्रिल रोजीं चौनें चर्चेची घोषणा केली. आणि त्यानंतर लागलींच " कांहीं झालें तरी चीन फॉर्मोसा ' मुक्त ' करण्याचा आपला सार्वभौम हक्क सोडावयास तयार होऊं शकत नाहीं " अशी अट घालून टाकली. अमेरिकेचा देखील अशाच प्रकारच्या कांहीं अटी घालण्याकडे आणि चर्चेच्या उपयुक्ततेविषयीं शंका व्यक्त करण्याकडे आग्रही कल दिसून आला.

" आतां चौ पुनः थोडेसें उपयुक्त दृष्टीनें महंमदअलीशीं बोलूं लागला आहे. अमेरिकेच्या भूमिकेंत बदल करण्याचा यत्न डलसहि करीत आहे.

" वॉशिंग्टनमधें एक नवें वातावरण निर्माण होत आहे. अमेरिकन वैमानिकांची चीननें सुटका केल्यास चर्चेला अधिक अनुकूल वातावरण निर्माण होईल हें जरी खरें असलें तरी डलसूचा त्याबाबत प्रास्ताविक अट म्हणून आतां आग्रह नाहीं. त्याचप्रमाणें चर्चेच्या सर्व अवस्थांमध्यें चँगनें भाग घेतलाच पाहिजे असाहि आग्रह नाहीं. असा आग्रह धरून अमेरिकेचें सामर्थ्य व जबाबदारी ज्या प्रकरणांत अंतर्भूत झालीं आहेत अशा बाबतींत अमेरिकेचें धोरण निश्चित करतांना चँगच्या मताला निर्णायक महत्त्व देण्याची त्याची तयारी नाहीं. अर्थात् चँगला केव्हांतरी या चर्चेत आणावेंच लागेल.

" एकंदरीनें परिस्थिति चर्चेच्या दृष्टीनें पूर्वीपेक्षां अधिक अनुकूल झाली आहे. फॉर्मोसांतील परिस्थिति निवळेल आणि लष्करी सामर्थ्य उपयोगांत आणण्याची आवश्यकता शिल्लक रहाणार नाहीं अशा तऱ्हेचा मार्ग शोधून काढण्यास दोघांना प्रवृत्त करण्याचे सर्व प्रयत्न ब्रिटन व आशिया यांनीं केले पाहिजेत. आशियांतील स्वतंत्र विचारसरणीचा डलसनें म्हटल्याप्रमाणें पेकिंगवर–आणि केवळ पेकिंगवरच नव्हे; अन्यत्र देखील–महत्त्वाचा परिणाम घडून आला असला पाहिजे. "

— ' मँचेस्टर गार्डियन ' ( २७ एप्रिल १९५५ ).

## बांडुंग-परिषदेचा आणखी एक परिणाम

" आमच्या मतें बांडुंग परिषदेच्या अत्यंत महत्त्वाचा परिणाम फॉर्मोसाविषयींचीं बोलणीं हा नसून तिच्यामुळें चीन आणि त्याच्या लगतचीं दक्षिणेकडील राष्ट्रें यांचे बदलते संबंध हा होय. सयाम, लाओ, ब्रह्मदेश इत्यादि लगतच्या प्रदेशांत बळजबरीनें घुसण्याचें धोरण तूर्त तरी सोडून देऊन आशियांतील तटस्थ शक्तींना उत्तेजन देण्याचें धोरण चीननें स्वीकारलें असावें असें दिसतें. या राष्ट्रांच्या सरकारांना चीनच्या सरहद्दीवरील प्रांतांची पहाणी करण्यास देण्यांत आलेलें आमंत्रण वरील गृहीतकृत्याच्या आधारावरच अर्थपूर्ण ठरतें. केवळ राजकीय डावपेच म्हणून त्यांत बराच धोका आहे.

" या मानानें चौएन्लायची अमेरिकेशीं बोलणीं करण्याच्या तयारीची घोषणा ही चीनच्या फॉर्मोसाबाबतच्या धोरणांतील बदल सूचित करणारी आहे कीं नाहीं हें बरेंच अस्पष्ट आहे. तो अमेरिकेशीं बोलावयास तयार आहे. पण पेकिंग रेडियोवरून सतत सुरू असलेला अमेरिकेवरील शिव्याशापांचा भडिमार पाहिला म्हणजे हीं बोलणीं कितपत यशस्वी होतील याबद्दल शंका वाटते.

" निश्चित बदल झाला असेल तर तो अमेरिकेच्या धोरणांतच ! वाढत्या लोकमताच्या पाठिंब्यानें चँगला किनाऱ्यालगतचीं बेटें सोडावयास लावण्याची आणि त्या आधारावर औपचारिक वा अनौपचारिक रीत्या युद्धतहकुबीचीं बोलणीं पेकिंगशीं करण्यची वॉशिंग्टनची तयारी झाली आहे. "–' ऑब्झर्वर ' ( १ मे १९५५ ).

## परिस्थिति सर्वत्र सुधारत असल्याचीं चिन्हें

" कम्युनिस्ट एक नवा प्रयोग सुरू करीत असल्याचें दिसतें. निरनिराळे प्रश्न सोडविण्यासाठीं बोलणीं करण्याची तयारी ते दर्शवीत आहेत. त्यांच्या मनांत काय आहे हें आपणांस माहीत नाहीं. तथापि तिसऱ्या महायुद्धाकडे वहावत जाण्याच्या परिणामांचा ज्यानें

पांच मिनिटें कां होईना विचार केला आहे. त्याला याबाबत कुतूहल वाटल्यावांचून रहाणार नाहीं. यामुळेंच चौघांच्या फॉर्मोसा-प्रश्नाबाबत बोलणीं करण्याच्या सूचनेची वॉशिंग्टनमधील पहिली प्रतिक्रिया पाहातांच पश्चिम युरोपांतील अनेकांनीं दांतओठ चावले असल्यास नवल नाहीं.

" तथापि काल रोजीं डलस् यांनीं अत्यंत उत्तम रीतीनें ही भूमिका सुधारून घेतली. कोणत्याहि व्यापक समझोत्यामध्यें चॅंगला बोलावलें पाहिजे हें जरी स्पष्ट असलें तरी तूर्त युद्धतहकुबीचीं बोलणीं होत असतांना चॅंगनें त्यांत भाग घेतलाच पाहिजे असा आग्रह अमेरिका धरणार नाहीं. आणि बोलणीं कोणत्या पद्धतीनें सुरूं व्हावींत याबाबत चौघांचा मनोदय जाणून घेण्याचा अमेरिका व्यवस्थामार्फत प्रयत्न करील.

" पाश्चात्त्य गटांतील अमेरिका हें सर्वांहून अधिक प्रबळ असें राष्ट्र आहे. आणि तेथील बहुसंख्य जनतेची पश्चिम युरोपबाबत आणि अतिपूर्वेकडील प्रश्नांबाबत कम्युनिस्टांचा दृष्टिकोण जाणून घ्यावा अशी मनःपूर्वक इच्छा आहे.

" ऑस्ट्रियांत पुढील आठवड्यांत भरणाऱ्या परराष्ट्रीय वकीलांच्या बैठकीस मॉलोटॉवनें मान्यता दिली आहे. यापुढची वड्या चौघांच्या अधिक वरच्या श्रेणींतील नेत्यांच्या बैठकीची बातमी लवकरच येईल अशी अपेक्षा आहे. तिकडे चौघेहि या संबंधीं काय होतें त्याची वाट पहात आहे. जुन्या परिचित दृष्टिकोणांतूनच पहाण्याची ही वेळ नव्हे. हुषारीनें आणि मनःपूर्वक काय होतें हें तपासून पाहण्याची ही वेळ आहे." **'न्यूज क्रॉनिकल'** ( २७ एप्रिल १९५५ )

## ऑस्ट्रिया आणि जर्मनी

" ऑस्ट्रियाबाबत एकमत होईल हें जवळजवळ निश्चित आहे. परंतु पुढें काय ? कम्युनिस्ट रेडियोवरून जर्मन जनतेला 'तुम्हीं देखील अशी परिस्थिति स्वतःसाठीं निर्माण करूं शकतां' असें सांगण्यांत येत आहे. परकीय सेना निघून जातील, जर्मनीचें एकीकरण होईल आणि सर्वत्र सौख्य नांदेल हा प्रचार ऐकणारे पश्चिम जर्मनींतहि असणारच. आणि त्यांना दोष कां द्यावा ? कारण हें सर्व खरोखरच होणार असेल तर अत्यंत आकर्षक आहे यांत संशय नाहीं. पण तें खरें आहे काय ?

" ऑस्ट्रिया आणि जर्मनींत दोन प्रकारचा महत्त्वाचा फरक आहे. एक म्हणजे युद्धानंतर ऑस्ट्रियाची कधींच फाळणी झाली नाहीं आणि तेथील राजवटींत कम्युनिस्टांचा हात नव्हता. जर्मनीचें एकीकरण म्हणजे कम्युनिस्ट राजवट आणि लोकशाही यांची एकत्र बांधली जाणारी मोटच होय. पश्चिम जर्मनींतील जनतेनें या ऐक्यामागें धांवणें म्हणजे आपलें राजकीय स्वातंत्र्य गमावण्यास सिद्ध होणें असा त्याचा अर्थ आहे.

" दुसरें म्हणजे ऑस्ट्रिया हें एक लहानसें राष्ट्र आहे. उलट, जर्मनी युरोपचें काळीजच म्हटलें पाहिजे. ऑस्ट्रियाला तटस्थ भूमिका घेणें शक्य आहे. पण जर्मनी तटस्थ रहावयाचा म्हणजे बराच काळपर्यंत रशिया आणि पाश्चात्त्य राष्ट्रें या दोहोंनाहि कल्पनातीत संयम पाळणें भाग आहे. हें -विशेषतः रशियाच्या बाबतींत कितपत शक्य आहे याचा जर्मन जनतेनें विचार केला पाहिजे.

" तथापि जर्मनीचें एकीकरण शक्य आहे. यासाठीं गेल्या वर्षी बर्लिन येथें कम्युनिस्टांनीं जें सांगितलें त्यापेक्षां त्यांना अधिक कांहीं सांगावयाचें आहे काय किंवा वड्या चौघांच्या भेटीस मान्यता देतांना मार्शल बुल्गॅनिन यांना वेगळ्या कांहीं सूचना करावयाच्या आहेत काय—या संबंधीं पाश्चात्त्य राष्ट्रांनीं चौकशी केली पाहिजे. बर्लिन-परिषदेनंतर चौदा महिन्यांचा काळ लोटला असून मॅलेंकॉवऐवजीं बुल्गॅनिन सत्तास्थानावर आला आहे. ऐकमत्य होण्याचा संभव कमी असला तरी रशियाच्या मनांत काय आहे हें पहाणें जरूर आहे."

— **'मॅंचेस्टर गार्डियन'** ( २७ एप्रिल १९५५ ).

## जर्मनीची तटस्थता ( ? )

" युरोपांतील दोन सत्तागटांमध्यें स्वीडन, स्वित्सर्लंड, ऑस्ट्रिया वगैरे राष्ट्रांचा मिळून एक तटस्थ पट्टा निर्माण करण्याची कल्पना गेल्या कांहीं आठवड्यांत पुढें आली आहे. ही कल्पना आकर्षक आहे. तथापि अशा पट्ट्यांतलें वकल या दृष्टीनें रशिया जर्मनीकडे पाहात आहे आणि यामुळें अडचणी निर्माण होऊं लागल्या आहेत.

" जर्मनींतील सोशल-डेमोक्रॅटिक पक्ष जरी 'तटस्थ' असा प्रत्यक्ष शब्दप्रयोग वापरीत नसला तरी अशाच स्वरूपाच्या योजनेकडे झुकत आहे. आणि जर्मन ऐक्य निर्माण झाल्यास या पक्षाला

निवडणुकींत बहुमत मिळेल असें रशियाला वाटतें. तथापि तटस्थ जर्मनीवर सोविएट रशियाचें दडपण येऊं शकेल या भीतीनें डॉ. ॲडनॉवर यांनीं त्या कल्पनेला त्याज्य म्हणून धिक्कारलें आहे.

"पाश्चात्त्य राष्ट्रें, जर्मनीचें सार्वत्रिक खुल्या निवडणुकीच्या आधारें एकीकरण व्हावें आणि आपले मित्र निवडण्याची जर्मनीस आरंभापासून पूर्ण मुभा असावी, असें म्हणतात. कारण अशी मुभा दिल्यास जर्मनी त्यांच्या बाजूलाच झुकेल असा त्यांना विश्वास वाटतो. पूर्व जर्मनी अशा प्रकारें हातून निसटण्याचा संभाव्य धोका पत्करण्यास रशिया तयार झाल्यावांचून जर्मनीचें एकीकरण जवळ येणें कठिण वाटतें.

" तर मग बड्या चौघांच्या बैठकींत चर्चा कशी होणार ? जर्मनीच्या एकीकरणाबाबत एकमत होण्याचा संभव नसल्यास त्यांनीं निदान जर्मनीच्या प्रत्येक विभागांतील सैन्य मर्यादित ठेवण्याचें, तरी ठरवावें. पाश्चात्त्य राष्ट्रांच्या करारानुसार जर्मनींत सेनेची उभारणी झाल्यास ती बारा डिव्हिजन्सपेक्षां अधिक होऊं नये असें ठरलें आहे. ही मर्यादा आधारभूत धरून पूर्व जर्मनींतील सैन्याच्या उभारणीवर अशीच मर्यादा घालतां येणार नाहीं काय ?

" युरोपांतील अत्यंत ' नाजुक ' समजल्या जाणाऱ्या या प्रदेशांतील सैन्याच्या उभारणीवर मर्यादा घातली जाणें सर्वांच्याच हिताचें आहे. लष्करीकरणावरील मर्यादांना येथून आरंभ करणें शक्य आहे. जर्मनीच्या दोन्ही विभागांत व्यापार व इतर दळणवळण खुलें करण्याचें ठरविल्यास अशा प्रकारची सैन्य-उभारणी आजच्या फाळणीला अधिक कडक स्वरूप देण्यास जबाबदार ठरेल हाहि आक्षेप शिल्लक रहाणार नाहीं. " — ' टाइम्स ' ( २२ एप्रिल १९५५ )

### वॉरसा येथील परिषद्

" पॅरिस-परिषदेप्रमाणेंच वॉरसा परिषदेचा हेतु बाह्यतः जर्मनी आणि युरोपची फाळणी कायम राखणें हाच आहे. आणि हें कार्य व्यवस्थितपणें पार पडावें यासाठीं मार्शल बुल्गॅनिन परिषदेस जातीनें हजर रहाणार आहेत.

" आपापलें सैन्य मध्ययुरोपांतून काढून घेण्याच्या प्रश्नावर बड्या चौघांच्या चर्चेंत देवाणघेवाण सुरूं झाल्यास मॉलोटॉवला अशा प्रकारच्या नव्या पौर्वात्य गटस्थापनेचा फायदाच मिळेल. ' तुम्ही पश्चिम जर्मनीशीं केलेला लष्करी करार मागें घेतल्यास आम्हीहि पूर्व जर्मनीशीं झालेला लष्करी करार सोडून देऊं ' अशी भाषा तो बोलूं शकेल.

" औपचारिक दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास दोन्ही बाजू अशा परिस्थितींत सारखींच सामर्थ्याचीं स्थानें सोडूं शकतील. अर्थात् या औपचारिकपणाला फारसें महत्त्व नाहीं. समझोता झाल्यास त्याच्या योगानें केवळ करारांचे कागद फाडले जाण्याऐवजीं सैन्य खरेंखुरें मागें घेतलें गेलें पाहिजे. तथापि जेव्हां पत पणाला लागण्याचा संभव असतो तेव्हां वरीलसारख्या औपचारिक भूमिकेलाहि महत्त्व प्राप्त होतें. "

— 'मँचेस्टर गार्डिअन' ( १० मे १९५५ )

१२-५-१९५५ — गोवर्धन पारीख

---

## साभार पोहोंच

**मराठी छंदोरचना (लयदृष्ट्या पुनर्विचार)**

[मुंबई विद्यापीठाची पीएच्‌डी. पदवी मिळालेला प्रबंध]- लेखक व प्रकाशक : डॉ. ना. ग. जोशी एम्. ए. पीएच्.डी., स्नेहसुधा, दांडिया बाजार, बडोदें. १९५५. पानें ४८२. किं. ९ रु.

---









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष